


[ भाग ५ वा ]

यशवंत गोपाळ जोशी

---

प्रथमावृत्ति

---

२१ जानेवारी १९४०]

# अनुक्रम

# श्री. यशवंत गोपाळ जोशी
## यांचीं इतर पुस्तकें

**कथासंग्रह**

| | |
|---|---|
| पुनर्भेट भाग १ ला (द्वितीयावृत्ति) | १-४-० |
| पुनर्भेट भाग २ रा | १-०-० |
| पुनर्भेट भाग ३ रा | १-४-० |
| पुनर्भेट भाग ४ था | १-४-० |
| तुळशीपत्र | १-८-० |

**नाटकें**

| | |
|---|---|
| संगीत भोळा शंकर | १-०-० |
| संगीत श्रीमुखांत | ०-१२-० |
| बोलका सिनेमा | ०-८-० |

**कादंबऱ्या**

| | |
|---|---|
| हिरकणी (शिल्लक नाहीं) | |
| होमकुंड (पूर्वार्ध) | २-०-० |
| श्रीकान्त | १-०-० |
| त्रिदोष | १-०-० |
| पडसाद | २-०-० |

## एक स्वभावचित्र : : : १

पुण्याहून मुंबईच्या प्रवासाला निघालों होतों. गाडीला अद्याप बराच अवकाशही होता आणि गाडींत गर्दीही फारशी दिसत नव्हती म्हणून बसलेल्या जागेवर टोपी ठेवून प्लॅटफॉर्मवर कांहीं वर्तमानपत्रें विकत घेण्याकरितां म्हणून उतरलों. एक दोन वर्तमानपत्रें विकत घेतलीं आणि तीं तशींच हातांत बाळगून प्लॅटफॉर्मवर हिंडणारीं माणसें पहात वेळ काढूं लागलों.

कांहीं वेळानें गाडी सुटण्याची घंटा झाली आणि मी घाईघाईनें माझ्या डब्यांत शिरलों.

पण आतां डब्यांत भयंकर गर्दी झाली होती. कित्येक लोक उभे होते. मी माझ्या जागेपाशीं आलों. तें एक तीन माणसांचें बाक होतें, तें एकाच इसमानें अडविलें होतें आणि तो इसम माझी टोपी हातांत घेऊन बसला होता.

मला पहातांच त्यानें विचारलें, "ही टोपी आपली वाटतं?"

"होय, मी बसलों आहें तिथं!"

तो मोठ्यांदा हंसत म्हणाला, "होय का ? पण आतां मी बसलों आहें इथं ! तरी हरकत नाहीं. आपण वसा इथं !" असें म्हणून औदार्य दाखवीत त्यानें मला शेजारीं बसायला जागा दिली आणि तो खिडकींतून बाहेरचें सौंदर्य पाहूं लागला.

मला त्या माणसाची मौज वाटली. तें तीन माणसांचें बाक होतें. एका माणसाच्या जागेवर त्यानें आपलें सामान ठेवलें होतें, एका माणसाच्या जागेवर तो ऐसपैस बसला होता आणि राहिलेल्या थोड्याशा जागेवर मी कुचमलेला बसलों होतों. गाडीनें वेग घेतला आणि गाडी चालू झाली. माझी जागा पटकावून बसलेल्या माणसानें एकवार माझ्याकडे पाहिलें आणि मी त्याच्या पचनीं पडलों ही त्यानें आपल्या मनांत खात्री करून घेतली आणि नंतर तो डब्यांत सभोंवार पाहूं लागला.

समोरच एक मनुष्य दोन माणसांची जागा अडवून ऐसपैस बसलेला त्याला दिसला.

त्याला कसली हिरीरी आली कुणाला ठाऊक. तो एकदम त्या माणसाजवळ गेला आणि त्याला अधिकारवाणीनें म्हणाला, "अहो मिस्टर, हें काय आपलं घर समजलांत कीं काय ? अगदीं ऐसपैस बसलां आहांत ? जरा सरकून बसा. तीं माणसं उभीं आहेत ना तिथं ! त्यांनींही तिकिटं काढलेलीं असतील !"

चांगलें बोलणाऱ्या माणसांबद्दल वाईट बोलणें लोकांना केव्हांही कठीण जातें ! तो मनुष्य निमूटपणानें नीट बसला. नंतर तो सामाजिक कार्यकर्ता जागा न मिळाल्यामुळें ताटकळत उभ्या राहिलेल्या माणसांपैकीं एकाजवळ गेला आणि म्हणाला, "अहो तुम्ही ! बसा ना तिथं—"

—पण त्यांनीं सांगितलेला माणूस त्या रिकाम्या जागेवर बसायच्या अगोदर दुसराच एक माणूस त्या रिकाम्या जागेवर जाऊन बसला. तें पाहून त्या सामाजिक कार्यकर्त्याला मनस्वी राग आला.

तो एकदम पिसाळून म्हणाला, "अहो मिस्टर ! आपल्याकरतां नव्हती केली ती जागा !"

पण त्या बसलेल्या माणसानें आपल्या खिशांतलें तिकिट त्या सामाजिक कार्यकर्त्याला दाखवीत म्हटलें, "मींही तिकिट काढलं आहे म्हटलं !" एवढें म्हणून त्यानें खिडकीबाहेर पाहायला सुरवात केली !

तो सामाजिक कार्यकर्ता त्या बेमुर्वतखोरपणानें खूप चिडला आणि म्हणाला, "आपल्या लोकांत शिस्तच नाहीं मुळीं ! अहो मिस्टर, उठा. मी ती जागा आपल्याला लाभूं देणार नाहीं !"

"कां हो ?"

"कारण ती जागा मीं रिकामी केली आहे !"

'थँक्स् !' बसलेला माणूस म्हणाला.

"मला जरूर नाहीं तुमच्या थँक्स्‌ची ! बोला तुम्ही ऐकणार का नाहीं माझं ?"

"पांच मिनिटांनीं उत्तर देईन या प्रश्नाचं !"

"मला आतां पाहिजे !"

"मिळायचं नाहीं !"

या आणि अशा प्रश्नोत्तरांत पांच मिनिटें निघून गेलीं आणि गाडी खडकी स्टेशनला थांबली.

तो बसलेला माणूस आपलें सामान घेऊन उतरूं लागला.

"कां हो ! आतां कां घाबरून दुसऱ्या डब्यांत पळतां ?"

तो माणूस प्लॅटफॉर्मवर उतरत म्हणाला, "माझं तिकिट खडकीचंच आहे! आणि तुम्हाला घाबरायला तुम्ही कोण? स्वतःच्या करमणुकीकरतां आणि बडेजावीकरतां उसनी ऐट मारणारे खूप सार्वजनिक कार्यकर्ते पाहिले आहेत मीं! नव्हे, लोकांना त्यांचाच हल्लीं फार त्रास होतो आहे!"

अपमान! अपमान!!

पण सामाजिक कार्यकर्त्याला तो सहन करावाच लागतो! कारण भावी मानमान्यतेचीं आणि पुढारीपणाचीं बीजें त्यांतच सांठविलेलीं असतात!

"काय मगरूर होता हो!" कुठून तरी सहानभूति मिळविण्याच्या आशेनें त्यानें डब्यांत चौफेर पहात म्हटलें.

"चालायचंच!" एकाला अगदींच गप्प बसून कंटाळा आला होता तेव्हां तोंडाचा चिकटा घालविण्याकरितां तो म्हणाला. येवढेंच नव्हे तर आपल्याजवळची सिगारेटही त्यानें त्या सामाजिक कार्यकर्त्यापुढें केली.

तो सामाजिक कार्यकर्ता या सहानुभूतीनें खुशींत आला. त्यानें ती सिगारेट पेटविली, त्या धुरानें आपला अपमान झांकून टाकला आणि पुन्हा तो डब्यांत चळवळ करायला उठला!

एक तरुण मुलगी एका बाकावर दोन पोरें घेऊन बसली होती आणि त्या बाकाला टेकून एक म्हातारा उभा होता.

"अहो बाई," तो सामाजिक कार्यकर्ता त्या बाईला म्हणाला, "इथं गर्दी करण्यापेक्षां बायकांच्या डब्यांत जाऊन कां बसत नाहीं? इथं कां गर्दी विनाकारण? बघा कीं तुमच्याच शेजारीं हे म्हातारबुवा उभे आहेत— उठा!"

आपल्या लोकांचीं मनें आणि कान असे तयार झालेले आहेत कीं कुणी सांगेल तें विचार न करतां श्रद्धेनें ऐकायचें! ती तर बोलून चालून बाईच. ती आपली उठूं लागली. पण तिच्या शेजारीं उभा असलेला तो म्हातारा तिला म्हणाला, "कुठं चाललीस? कांहीं उठायचं कारण नाहीं. बस तिथंच!"

त्या मुलीला पुन्हा हें ऐकायला मिळालें—ती पुन्हा खालीं बसली!

"अहो! तुमचीच सोय पहातों आहें मी!" सामाजिक कार्यकर्ता.

"तें मला समजतंय—" म्हातारा कोकणी आवाजांत म्हणाला.

"मग?"

"मग काय? आहे हें ठीक आहे! ती माझी मुलगी आहे आणि ती तिथंच बसायला पाहिजे! आमची सोय आम्ही पूर्णपणें जाणतों!"

"पण आपल्यासारख्या वृद्धांनीं उभें राहून—"

"अहो चालायचंच! चांगलीं चांगलीं माणसं अवेळीं मरतात आणि तुमच्या-आमच्यासारखीं विनाकारण जगतात— आपण मरून त्यांचं आयुष्य कांहीं वाढवितां येत नाहीं ना आपल्याला? जगांत अशी सोय गैरसोय चालायचीच!"

इथेंही त्या तरुण कार्यकर्त्याची चळवळ थंडावली!

पण त्याला कांहीं स्वस्थ बसवेना. त्या डब्यांतली समाजाची घडी कांहीं त्याला नीट बसवितां येईना. तेव्हां त्यानें डब्यांत विचारक्रांति करायचें ठरविलें! पण ती अगोदरच होत चालल्याचें त्याच्या अनुभवाला आलें. तो बोलण्याकरितां माणसें शोधूं लागला!

एका खादीवेषधारी माणसाजवळ जाऊन तो गांधींची स्तुति करूं लागला. पण प्रत्युत्तर म्हणून त्याला त्या खादीवेषधारी माणसाकडून गांधींची निंदा ऐकूं आली! म्हणून अद्यापही हंगेरियन टोपी

वापरणाऱ्या सद्गृहस्थाजवळ तो 'हिंदु महासभे'ची चौकशी करूं लागला तर तो अस्सल गांधींच्या बाजूचा निघाला ! आणि खादी वापरणें आपल्याला पूर्वसवयीमुळें जमत नाहीं पण खादीशिवाय स्वराज्य मिळणें कसें अशक्य आहे हेंच तो त्याला समजावून द्यायला लागला !

जवाहरलालसारख्या पोशाखांत त्याला एक तेजस्वी तरुण दिसला म्हणून त्याजवळ तो राजकारणविषयक बोलूं लागला तर तो एका सिनेमा कंपनीचा ॲडव्हरटाईझिंग मॅनेजर निघाला! आणि राजकारणाबद्दल तो आपल्या भाषेंत बोलूं लागला, "धन्य आहे बुवा गांधींची ! त्यांनीं आपली चळवळ किती आठवडे टिकविली आहे ! आम्ही येवढी जाहिरातबाजीची सरकस करतों--पण आमचा एखादा चित्रपटसुद्धां इतके आठवडे टिकवितां येत नाहीं आम्हांला ! आणि हें राजकारण इतके आठवडे कसं टिकवितात राम जाणे !" आणि असें तो बोलल्यानंतरही तो सामाजिक कार्यकर्ता जेव्हां हंसला नाहीं तेव्हां त्यानें आपल्या बुद्धीचा तोच अपमान मानून एक मोठा चिरूट शिलगाविला आणि त्यांतून निघणाऱ्या धुराकडे तो 'सिनेमा शो' सारखा पाहूं लागला !

एका निबरट चेहऱ्याच्या, तांबड्या भडक डोळ्यांच्या व फेज कॅप डोक्याला अडकविलेल्या एका मवालीवजा माणसाकडे तो वळला तर त्या मवालीवजा दिसणाऱ्या माणसानें एक रामदासांचा श्लोक ठणकावून म्हणून तो हैदराबाद सत्याग्रहाला निघाल्याचें त्यानें जाहीर केलें !

असल्या गंमती मी पहात होतों आणि तो अनुभवीत होता ! आणि मला आणखी एक जादा गंमत अनुभवायला मिळत होती. ती

म्हणजे त्या समाजकार्यकर्त्याची! कारण तोही एक नमुनाच होता!

तो प्रवासाला निघाला होता का लोकसेवेला?

पोहायला न येणारा पण पोहायची इच्छा असलेला माणूस जसा कांठावेंच पाणी उसळवून किंवा हातानें थोपटून खराब करीत बसतो त्याप्रमाणें त्यानें चालविलें होतें. शेवटीं तो कार्यकर्ता कंटाळला आणि परत आपल्या जागेकडे वळला.

तो तेथून गेल्यामुळें मी जो ऐसपैस बसलों होतों तों तो जवळ येतांच पुन्हा आकुंचन पाऊन बसलों.

तेवढ्यानेंही त्याला आपला मोठेपणा दाखवायला सवड मिळाली. माझ्याकडे खुशींत पहात तो हंसत हंसत म्हणाला, "असूं द्या! असूं द्या! तुम्ही कां असे बसतां विनाकारण? हीं काय वर्तमानपत्रं वाटतं? आजचींच? विकत घेतलींत तुम्हीं? बरेंच शोकी दिसतां आणि अद्याप उघडली नाहींत?" —पण त्यानें तें माझें राहिलेलें काम केलें आणि पांचसहा मिनिटांत त्यानें तीं सर्व वर्तमानपत्रें चाळून संपविलीं.

नंतर एक दोन मिनिटें तो स्वतःशींच कसला तरी गंभीर विचार करीत होता. नंतर स्वतःशींच थोडासा खिन्न हंसला. नंतर खिडकींतून आंत शिरणारें ऊन त्यानें आपला हात तिथें ठेवून किती कढत आहे हें पाहिलें. आतां चेहऱ्यानें तो अगदीं मलूल झाला होता आणि तसल्याच आवाजांत मला तो म्हणाला,

"कांहो? मी बोलूं का तुमच्याजवळ कांहीं?" आतांपर्यंतच्या त्याच्या वागणुकींत न दिसणारें मार्दव त्याच्यांत दिसूं लागलें होतें!

कदाचित् आतांपर्यंत तो दुसऱ्यांच्या आयुष्याशीं खेळत होता आणि आतां स्वस्थ बसल्यामुळें मनांतल्या मनांत त्यानें स्वतःच्या आयुष्याकडे पाहिलें असावें आणि त्यामुळें ती मार्दवता आणि

तिच्या आड लपलेलें तें कारुण्य आलें असेल का ?

पण माझ्या मनांत येणारे ते विचार सांवरीत मींही साळसूद-पणानें म्हटलें, "बोला कीं !"

"जग सुधारत आहे का बिघडत आहे ? आपलें काय मत आहे ?"

"पहिल्यांदा आपलं मत ऐकायला मिळालं तर बरं." मीं म्हटलें.

तो एकदां खूप मोठ्यांदा हसला, आणि डब्यांतल्या विजेच्या दिव्यावर नजर रोखीत म्हणाला,

"जगाचे विचार फार झपाट्यानं सुधारत आहेत पण वागणूक मात्र तितक्याच झपाट्यानं बिघडत आहे असं माझं मत आहे ! पण हें माझं चालू आठवड्यांतलं मत आहे बरं का ! कांहीं दिवसांपूर्वी मला असं वाटत नव्हतं. सध्या वाटतं आहे–पण आणखी कांहीं दिवसांनीं मला असंच वाटेल असं सांगतां येत नाहीं !–बरं चहा वगैरे घेणार का कांहीं ?"

"घेऊं या कीं !" चहावाला आमच्याभोंवती घुटमळत होताच. मीं दोन कप चहा सांगितला.

"मला वाटतं आपण चहाच्या अगोदर खाऊं या कांहीं तरी !" या बोलण्यापाठीमागें, कां कुणाला ठाऊक, मला थोडीशी केविल-वाणी वखवख वाटली.

"बरं सांगा काय हवं तें !" मीं म्हटलें.

आमचें खाणें आणि चहा झाला.

पैसे मींच चुकते केले.

"ओ थँक्स !" त्यानें पावती दिली व पुढें तो म्हणाला, "बरं, जगाबद्दल आपलं मत ऐकायचं राहिलंच !" त्यानें पुन्हा पृच्छा केली.

"आतां मी मधेंच विचारूं का कांहींतरी ?"

"खुशाल !"

"आपला व्यवसाय ?"

"परीक्षा पास होऊन झालीं दोन तीन वर्षे. व्यवसाय अजून ठरायचा आहे !"

"इतकी दिरंगाई ?"

"माझ्या हातांत काय आहे ? माझा व्यवसाय परिस्थिति ठरवणार !"

"लग्न वगैरे कांहीं ?"

"अद्याप नाहीं !"

"इतक्यांत विचार नाहीं वाटतं ?"

त्यानें अत्यंत निराशेनें विकट हास्य केलें.

"कां– कांहीं प्रणयभंग वगैरे ?"

"हो– तसंच !" खूप हसला तो. "पण तो एकतर्फीच बरं का ! मीं प्रेम करण्याचा प्रयत्न केला बऱ्याच ठिकाणीं ! पण माझ्यावर कोणींच प्रेम केलं नाहीं ! गांवांत आणि वर्तमानपत्रांत खूप प्रेमाच्या भानगडी ऐकायला मिळतात– त्या तसल्या पोरी कुठं असतात कुणाला ठाऊक ! का प्लेगाच्या दिवसांत केस होते एखादीच पण बभ्राच फार होतो– तसं आहे का कांहीं कुणाला ठाऊक !" या बाबतींत त्याच्या बोलण्यांतला तो विषण्ण विनोदी सूर मला सहन होईना. मी त्याच्याकडे जरा आस्थेवाईकपणानें पाहूं लागलों !

तो नाकींडोळीं देखणा दिसत होता. त्याचे डोळे सतेज होते. त्याच्या दृष्टींत एकप्रकारची बोंच होती. अतृप्तपणा होता. वखवख होती. झाडावरचें एखादें तयार फळ हात न लावतां बियांकरितां मुद्दाम झाडावरच वाळूं द्यावें तसा तो– देहानें, मनानें, विचारानें

वाळत चाललेला दिसला !

"मग आतां काय ब्रह्मचारी राह्यचा विचार आहे कीं काय आपला ?" मीं कांहीं तरीच विचारलें.

"तो आपोआपच ठरवावा लागेल बहुतकरून ! माझ्या हातीं काय आहे ? पण समजा तसं जरी झालं तरी तें आयुष्यभर झेपेल असं नाहीं वाटत आपल्याला ! नेहमीं परवडत नाहीं किंवा धारिष्ट झालं नाहीं तरी एखाद्या वेळेला तरी वाममार्गानं तें सुख न हाताळणं अशक्य वाटतं मला !"

मला विषय बदलावासा वाटला.

"आतां कुठं प्रवासाला ?"

"हं !"

"कुठपर्यंत ?"

"कदाचित् पुढच्याही स्टेशनवर उतरीन किंवा मुंबईपर्यंतही येईन ! सध्या कांहीं दिवस प्रवासांत घालवायचे ठरवले आहेत मीं !"

"मगाच्या आपल्या बोलण्यावरनं सहज विचारतों— आपला राजकीय पक्ष ?"

"तसं कोणतंच लेबल नाहीं वापरीत मी ! कारण अजून...अन् लेबलाशिवाय काय नडतं आहे ? अहो, पक्षाचं लेबल म्हणजे निव्वळ फसवणूक ! तसलं संधिसाधु राजकारण नाहीं आवडत आपल्याला ! थोडक्यांत सांगायचं म्हणजे व्यवहारांत अद्याप मी कच्चा आहें आणि खरं सांगायचं म्हणजे अद्याप मी काय आहें तें माझं मलाच कळलेलं नाहीं !"

हें आमचें बोलणें चाललें होतें तोंच गाडीनें तळेगांव स्टेशनांत प्रवेश केला आणि तळेगांव स्टेशन सोडतांना आम्ही बसलों होतों.

त्याच्या अगदीं विरुद्ध टोकानें आमच्या डब्यांत तिकिट इन्स्पेक्टरनें प्रवेश केला !

तिकिट इन्स्पेक्टरनें डब्यांत चढतांच एकवार सर्व डब्यांत निरखून पाहिलें. अर्थात् माझा नूतनपरिचित दोस्तही त्याच्या चाणाक्ष नजरेंतून सुटला नाहीं !

आणि त्या दोघांची नजरानजर होतांच तो माझा दोस्त एकदम हसत हसत उठला आणि त्यानें तिथूनच त्या इन्स्पेक्टरला राम राम ठोकला !

मला वाटलं त्यांची एकमेकांची जानी दोस्ती असावी !

तो दोस्त आपलं सामान आवरूं लागला आणि मला म्हणाला, "मला इथंच उतरायला पाहिजे हंऽ ! हे महाराज भेटले ना आज इथंच– मला वाटलं होतं कीं कदाचित् आज मुंबईपर्यंत जातां येईल–"

"का तुमचं त्यांचं कांहीं नातं ?"

"वा ! अगदीं जिव्हाळ्याचं ! त्यांच्या हद्दींत फिरतों ना आम्ही ! आणि तें त्यांना कायद्यानं चालूं देतां येत नाहीं ! यांच्या हद्दींत फिरायला तिकिट काढावं लागतं– आणि तें आज मीं काढलेलं नाहीं– आणि कधीं काढींतही नाहीं. कारण काय, मला शक्यच नाहीं तें— !"

मला आतां कुठं त्याची थोडी थोडी ओळख पटूं लागली होती.

"—असं पहा," तो पुढें म्हणाला, "आमची इच्छा नसतांनाच आमचं आयुष्य सार्वजनिक होऊन गेलं आहे !—म्हणजे काय —सर्वांचा संबंध येतो आमच्या आयुष्याशीं ! मला कांहीं मतं आहेत पण तीं परिस्थितीनं संभाळतां येत नाहींत ! कांहीं सार्वजनिक कार्य करायची इच्छा आहे ! याच्यांतूनच कांहीं कार्य करायला कधीं सवड सांपडली तर ऐकाल तुम्ही सुद्धां आमचं नांव वर्तमानपत्रांतून

कधींतरी ! इच्छा बळकट आहे- आशावाद जबरा आहे-"

इतक्यांत तो तिकिट इन्स्पेक्टर त्याच्याजवळ आला आणि चिडून म्हणाला,

"अहो साहेब ! आतां फार झाल हं तुमचं ! सुशिक्षित आहांत- आणि असालही कदाचित् परिस्थितींत. म्हणून आतांपर्यंत तुम्हांला गाडींतून उतरवीतच आलों. पण आज मात्र तुमच्यावर खटला—"

"काय म्हणतां काय ? खरंच ?" त्यानें हंसत हंसत विचारलें. "वाः ! मग आज माझ्या आयुष्यांत कांहींतरी प्रगति होणार म्हणायची ! वाः छान !"

त्या इन्स्पेक्टरला आतां आपलें शहाणपण त्याला ऐकवायची इच्छा झाली. तो म्हणाला, "फुकट फिरायचं आणि गांधी टोपी आणि खादीचे कपडे घालून- गांधी-तत्त्वज्ञानाची विटंबना नाहीं का यांत ?"

तो तरुण अत्यंत कडवटपणानें परिस्थितीचा विनोद करीत म्हणाला, "यांत गांधी-तत्त्वज्ञानाविरुद्ध काय आहे ? महात्मा गांधी नाहींत का कॉंग्रेसचं चार आण्याचंसुद्धां तिकिट न काढतां सबंध कॉंग्रेसवर हुकमत चालवीत ! तो विदाऊट तिकिट कार्यक्रम तुम्हांला आवडतो ! आणि आमचा विदाऊट तिकिट प्रवास—?"

"पण हा प्रवास करण्याची जरूरी काय तुम्हांला ?" इन्स्पेक्टर.

"मग काय करणार दुसरं ? वर्षभर घरीं बसून काढलं— आतां जरा प्रवास करतों— आणि हे कपडे मताकरितां नाहींत हो— स्वताईकरतां आहेत ! ज्याच्या ज्याच्या अंगावर खादी आहे किंवा प्रसंगपरत्वें ज्यांनीं आपलीं मतं रंगवून वर खादीचे अभ्रे चढविले आहेत ते ते काय शुद्ध सात्त्विक समजतां कीं काय तुम्ही ?"

"मला वादविवाद करायची जरूरी नाहीं- आपण त्या कोपऱ्यांत

जाऊन उभे रहा जरा—" तिकिट इन्स्पेक्टर चिडून म्हणाला. मीं तिकिट इन्स्पेक्टरला जरा बाजूला घेऊन कांहीं सांगितलें आणि त्यानें संमति देतांच मी माझ्या नवीन दोस्ताला परत जाग्यावर बसायला सांगितलें !

तो येवढें सर्व हसत खेळत बोलत होता. पण एकींकडे तो खूप घामाघूम झाला होता. डब्यामध्यें सार्वजनिक चळवळ करणारा माणूस 'विदाऊट तिकिट' असल्याचें कळल्यावरून डब्यांत खूप हंशा पिकला होता ! पण सार्वजनिक कार्यकर्त्याला जोंपर्यंत लोक पगार मोजीत नाहींत तोंपर्यंत लोकांनीं असे थोडेसे कुठें स्वार्थाचे खरूज, नायटे दिसले तर कां हसावें ? सार्वजनिक कार्यकर्ते कांहीं संस्थानिक नसतात ! आतां एखादा तसाच निःस्पृह असेल तर आनंदाची गोष्ट आहे ! पण चारित्र्याकडे फारसें पहायचें नाहीं असा काणाडोळा लोकच दाखवितात ना ? जिभेची वळवळच प्रभावी ठरते ना ?

सार्वजनिक कार्यक्रमाचा उपयोग लोक मनोरंजनाकडे करून घेतात ! आणि मनोरंजक कार्यक्रमांतले खिळाडू सहजच चारित्र्यानें थोडे सैल असणारच !

वास्तविक असें असूं नये ! पण आपल्याला हसायला हवें असतें, आणि ते आपणाला हसवितात ! संपला तुमचा त्यांचा संबंध ! चारित्र्य ही जुनी गोष्ट आहे ! सध्या चारित्र्याची भूमिका आतषबाजीनें घेतली आहे !

त्यानें आपला घामेजलेला चेहरा खिशांतल्या हातरुमालानें पुसला आणि जरा लाजूनच माझ्या शेजारीं बसला.

"मला वाटतं माझ्याशीं बोलायला आतां तुम्हांला कमीपणा वाटेल—" त्यानें मला विचारलें.

"कांहीं कारण दिसत नाहीं तसं !"

"काय होतं बघा— शिक्षणानं मनं जिवंत होतात ! आपल्याला असं कांहीं तरी स्वतंत्र वाटूं लागतं आणि तें बोलायला सापडलं नाहीं कीं मग मन पिसाळतं ! कित्येकांचीं पोटापेक्षां मनं जास्त जिवंत असतात— त्यांपैकीं मी एक आहें ! म्हणजे पोटाची कांहीं अगदींच उपासमार सहन होत नाहीं मला !"

मधें तो दोन चार मिनिटें बोलायचा थांबला आणि पुढें म्हणाला, "आतां मगाशीं मीं तुम्हांला चहापाण्याची आणि खाण्याची इच्छा दर्शविली पण किती सभ्यपणानें ? अहो, खिशांत तांबडी शिवराई नाहीं माझ्या ! मीं सिगारेट ओढायला लागल्याला एकदोन वर्षं झालीं, पण शपथेवर सांगतों तुम्हांला अद्याप मीं पै खर्च केली नाहीं त्याकरितां ! मिळाल्या तर सारखा ओढतों— नाहीं तर नाहीं ! अशी अनिश्चित चैन असते माझी !"

मी आपल्या खिशांतली सिगारेट त्याच्यापुढें केली आणि ती तो मोकळेपणानें ओढूं लागला आणि त्या सिगारेटवरची क्षणानें राख झाडीत तो म्हणाला, "तिकिट नसलं तर डब्यांतनं उतरवायचा कायदा आहे— तसं जगायचं नसलं तर आत्महत्या करायला परवानगी कां असूं नये ? नाहींतर मग शिक्षणानं तरुणांचीं मनं पेटवूं नयेत ! चांगलं काय आहे तें आम्हांला समजावून देतां— आणि तसं वागण्याची सोय नाहीं—कंटाळा आला का तुम्हांला ?"

"नाहीं बुवा !" मीं म्हटलें.

"तेव्हां हा हिणकसपणा मीं आयुष्यांत पत्करायचा ठरवला आहे ! सभ्यपणानं असा कुणाजवळून तरी चहापाणी काढतों —जमेल तितका प्रवास करतों—खालीं उतर म्हटलें खालीं उतरतों !

मी म्हणतों लोकांचीं माझ्याविषयींचीं मतं बदलतील पण माझीं मतं तर कायम राहतील ! तेवढंच बौद्धिक समाधान ! !"

"बरं, तुमचीं अशीं मतं तरी काय आहेत ?"

"मतं कसलीं आलीं आहेत हो ! मनःप्रवृत्तीचा एकप्रकारचा मोकळेपणा ! आतांपर्यंत चार दोन ठिकाणीं वर्तमानपत्रांत नोकऱ्या केल्या– मनाची फार कुचंबणा व्हायला लागली ! पण आतां ठरवलं आहे पोटापाण्याकरितां बौद्धिक विभागात नोकरी नाहीं पहायची ! शारीरिक कष्टाची नोकरी पहायची, कीं जिथला मालक आपल्या शरीरावर हुकमत चालविल– मनावर चालविणार नाहीं ! बरं तें जाऊं द्या ! तिकिट इन्स्पेक्टरला काय सांगितलंत तुम्हीं ?"

"तुमच्या तिकिटाचे पैसे मी देतों म्हणून ! चला आज माझ्या-बरोबर मुंबईला."

"चला कीं ! मला नाहीं त्यांत कांहीं लाजिरवाणं वाटत आतां ! तुम्ही शोकाकरितां तिकिट काढून सिनेमा पहात असालच कीं नाहीं ! तुम्ही माझ्या तिकिटाचे पैसे खर्च करणार आहांत त्याबद्दल मी माझ्या आयुष्याचा आणि विचारांचा चित्रपट मी तुम्हांला दाखवा-यला तयार आहें ! सौदाच समजा ना हा एक !"

"काय समजायचं तें माझं मी ठरवीन. तुम्ही माझ्याबरोबर मुंबईला चला. मी एक दिवस रहाणार आहें तिथं आणि परत या माझ्याबरोबरच. माझाही धंदा आहे. मी करतों तुमची व्यवस्था कांहीं तरी !"

"कांहीं हरकत नाहीं ! पण माझ्या मतांची वाट काय ?" आणि स्वतःच्या पोटावर हात चोळीत तो म्हणाला, "हा खड्डा तुम्ही भर-णार म्हणून माझ्या मतावर नाहीं ताबा चालवितां येणार तुम्हांला !

माझीं मतं— मतं म्हणजे काय जिथं जें चांगलं दिसेल तें चांगलं म्हणावं आणि तिथंच कांहीं वाईट दिसलं तर तेंही मोकळ्या मनानें बोलायला कोणाचं माहात्म्य आड येऊं नये! हिंदुस्थानांत ज्या ज्या चळवळी चालू आहेत त्या जर हिंदुस्थानच्या अंतिम चांगल्या-करितांच सर्वजण करतात तर सर्वांकडे सारख्या आपुलकीनें पहातां यावं—मी इथें आहें म्हणून तिथं असतां कामा नये असा दंडक नसावा! व्यक्तिपूजा डोईजड होऊं नये! जातीय संघटना असावी पण तींत जातीयतेचं विष असूं नये! सिनेमाकंपनींतल्या पात्राप्रमाणें आपल्या पुढाऱ्यांनींही नटसम्राट, गायनभैरव अशांसारख्या झुंझार-दरकदार इत्यादि विनाकारण पदव्या वापरून स्वतःची शोभा करूं नये व दर्प वाढवूं नये— अणि लोकांनीं त्यांची तशी शोभा करायची ठरविली तरी त्यांनीं ती चालूं देऊं नये— वगैरे वगैरे खूप किरकोळ वाटतं मला—"

"चला तुम्ही माझ्याबरोबर! तुम्हांला काय वाटायचं तें वाटूं द्या! मी तुमच्या पोटापाण्याची व्यवस्था करतों—आणि त्यांत इतर बाबतींत काय पण खुद्द माझ्याबद्दल जरी तुमचं मत विरुद्ध झालं तरी मला कांहीं वाटायचं नाहीं त्याच्यांत!"

तोंच तिकिट इन्स्पेक्टर पुन्हा माझ्याजवळ आला. मी त्याच्या तिकिटाचे पैसे देऊं लागलों. आणि सहज मीं त्याच्याकडे पाहिलें—

— सबंध आगगाडीचा मालक असल्यासारख्या रुबाबांत तो ऐटीनें बसला होता. कारण कोणी का देईना— आज त्याच्या तिकिटाचे पैसे रेल्वेला मिळाले होते!

## उन्माद : : : २

वास्तविक मी सांगणार असलेली गोष्ट आहे एका सिनेमा कंपनींतील. पण उगीच कुणाबद्दल स्पष्ट कशाला लिहा! आपण असें समजूं कीं ती एका गिरणींतील गोष्ट आहे! गिरणी म्हणजे केवढी गिरणी ?—अगदीं मोठी गिरणी.

आणि आपण असें समजूं या— कीं त्या गिरणीचा वार्षिक वाढदिवस करण्याची रीत आहे— आणि त्या दिवशीं सत्यनारायण करण्याचीहि त्या गिरणींत पद्धत आहे.

—आणि आपण असें समजूं कीं त्या गिरणीचा मालक चांगला आहे. फक्त त्याच्यांत दोष येवढाच आहे कीं आपण जितके चांगले आहोंत त्यापेक्षां आपण जास्त चांगले आहोंत असें दाखविण्याची त्याची लकब आहे.

—मला त्या मालकाविषयीं आदरही आहे आणि चीडही आहे. आदर अशाबद्दल कीं तो मूळचा चांगला आहे आणि चीड अशाबद्दल कीं अवान्तर चांगुलपणाची खूप फेस पावडर त्याला आपल्या

तोंडाला लावायची संवय आहे !

—समजा एक खाटिक आहे. बिचाऱ्याचा धंदाच पडला तो. एरवीं स्वभावानें तो चांगलाही असूं शकेल– पण तो जर असें सांगूं लागला कीं, 'जनावरांचीं दुःखं कमी करण्याकरितां– माझ्या अंतः-करणाला पसंत नसतांना सुद्धां– मीं हा धंदा काढला आहे, आणि यांत समाजकल्याण आहे ! धर्माची उन्नति आहे !! देशाची सेवा आहे !!' तर काय वाटेल आपणाला ?—जें आपल्याला वाटेल तेंच मला त्या मालकाबद्दल वाटतें

* * *

आज त्या गिरणीचा वाढदिवस होता. 'सबंध गिरणी शृंगारलेली होती. बाहेरच्या मोकळ्या पटांगणांत मोठा थोरला मंडप घातला होता. चित्रविचित्र झालरींनीं तो शृंगारला होता. 'काम करतांना स्वार्थाची हिणकस भावना मनांत ठेवूं नका !' 'कामाकरितांच काम करा !' वगैरे वगैरे नाना प्रतिबोध-वाक्यांचा पाट्या रंगवून मंड-पांत लाविल्या होत्या. लोक नेहमीं समारंभप्रिय असतात. सर्व लोकांनीं त्यांत हौसेनें भाग घेतला होता.

सकाळीं मालकांना मानपत्र अर्पण करण्यांत आलें. त्या मान-पत्रांत कामगारांनीं मालकांची खूप खूप स्तुति केली होती. मानपत्रां-तील वरची अलंकाराची भाषा जर काढून टाकली तर खालीं येव-ढींच उघडींबोडकीं वाक्यें शिल्लक राहिलीं असतीं, 'आपण मालक आहांत– इलाज नाहीं– यापेक्षां जास्त काय सांगावें ? नशीब आपल्या बाजूचें आहे– आपण त्याला कर्तबगारी म्हणत आहांत. आम्हांला मंजूर नाहीं ! जोंपर्यंत नशीब आपल्या बाजूचें आहे तोंपर्यंत अर्थात् आम्हीही आपल्या बाजूचे आहोंत. फार काय लिहावें ! आपण

मनांतून हें जाणतांच, हे विनंति !'

त्या मानपत्राला मालकांनींही उत्तर दिलें,

"आपण मला मालक समजतां पण मीही तुमच्यापैकींच एक नोकर आहें–" वगैरे वगैरे! लोक जाणून होते–हा समारंभ आहे. यांत बोललेल्या शब्दांच्या अर्थाकडे लक्ष द्यायचें नसतें !

कामगार मनांत म्हणत होते, "चुकून चांगलं बोलतो आहेस– बोल ! वर्तमानपत्रांतील स्तुति पाहिजे आहे लेकाला !"

आणि मग संध्याकाळीं सत्यनारायणाच्या पूजेला सुरुवात झाली. गांवांतील मोठमोठी मंडळी जमा झाली. कामगारांनीं मनांत धसका घेतला ! इतके लोक यांचे बाहेरचे पाठीराखे आहेत. यांच्याबद्दल वाईटही जरा कमीच बोललें पाहिजे बाहेर !

सत्यनारायणाला सुरवात झाली. मालक सुरुवातीपासून हजर होते. किती ध्यानमग्न चेहेरा दिसत होता त्यांचा ! आपण असें समजूं या कीं ते पोथीच ऐकत होते !

शेवटीं आरती झाली. तीर्थप्रसाद वांटला गेला.

—आणि नंतर एक खास प्रोग्राम होता.

त्या गिरणींत एक मोठा नोकर होता. त्याला पगारही खूप होता. तो पट्टीचा गाणारा होता. तो गवयाचा धंदा करीत नसे– पण तो जर धंद्याला बाहेर पडला असता तर त्याला मिळत असलेल्या पगारापेक्षां त्याला गाण्यावरच किती तरी अधिक पैसे मिळाले असते.

—त्यानें गाण्याला सुरुवात केली. तो अगदीं मनापासून गाऊं लागला. त्यामुळें गाण्याला सुरुवातीपासूनच खूप रंग भरला ! सर्व लोक डोलूं लागले. तल्लीन झाले.

—पण तें मालकाला सहन झालें नाहीं !

—सर्व लोक तल्लीन झाले– आणि आपणही नुसतेच तल्लीन झालों तर आपलें वैशिष्ट्य काय राहिलें त्यांत ?

—काय वैशिष्ट्य दाखवावें याचा मालक विचार करूं लागले !

—त्यांनीं डोळे मिटून गाणें ऐकायला सुरवात केली !

—मालक गाण्याच्या भावनेंत गेल्यासारखे आपले डोक्यावरचे साफसूफ बसविलेले केस फिसकारूं लागले.

—आणि आपणं असें समजूं या कीं त्यांना कांहीं तरी वैशिष्ट्य दाखविण्याची कल्पना सुचली !

—काय बरें असावी ती ?

'ओ ऽ ऽ हो ! ओ ऽ हो !! वाः ! वाः ! वाः !!' डोळे मिटूनच ते अशीं शब्दांचीं फुलें उडवूं लागले.

त्या शाब्दिक फुलांचाही परिणाम गवयावर झाला. तो अगदीं दिलखेचक गाऊं लागला.

—मालकांचेंही हंबरणें चालूच होतें !

जमलेल्या लोकांचें लक्ष आतां दोघांवरच खिळून राहिलें.

—आपल्या मालकांवर आणि त्या गवयावर !

—आणि त्या दोघांत तर जणूं चुरस लागली होती !

गवई गाण्यांत 'कमाल' करूं लागला !

मालक रसिकता दाखविण्यांत 'कमाल' करूं लागले.

लोक मनांतल्या मनांत पैज मारूं लागले, 'पाहूं या आतां कोण हरतो तें.'

'कले'ची आणि 'रसिकते'ची झुंज लागली.

'पाहूं या आतां जगांत कला जास्त आहे का रसिकता जास्त आहे ती !' लोक मनांत म्हणत होते असें आपण समजूं या !

तास झाला. दोन तास झाले. तीन तास होत आले !

—कोणीच बोलेना, ऐकेना !

आणि त्या उभयतांच्या या झुंजीमुळें लोकांचें गाण्यावरचें लक्ष उडून गेलें होतें. आणि ते ती झुंज पहात स्वस्थ बसले होते.

अखेर 'रसिकते'ची मालकांनाच धाप लागल्यासारखें झालें !

—ते गाण्याचा शेवट कसा करावा या विवंचनेंत पडले.

—आणि आपण असें समजूं या कीं त्यांना उपाय सुचला !

—त्यांनीं समोर सत्यनारायणाच्या पूजासामग्रीकडे आपला हात वळवला. हलकेच त्यांतील एक कापराची वडी त्यांनीं हस्तगत केली. हळूच ती त्यांनीं आपल्या डोळयांच्या बुबुळांवरून फिरविली !

—चमत्कार !

—त्यांचे डोळे जणूं गाण्यामुळेंच अश्रूंनीं भरून निघाल्याचा देखावा तयार झाला !

—ते उभे राहिले. डोळयांत पाणी होतेंच. त्यांनीं आतां हुंदके द्यायला सुरवात केली !

—ते धीरगंभीरपणानें गवयाच्या बैठकीच्या रोखानें मार्ग आक्रमूं लागले.

—गवईही मनांतल्या मनांत उचंबळूं लागला होता,

'आतां मालकांकडून काय वरप्रसाद मिळणार आपल्याला ?'

—लोकही त्याच कल्पनेंत बेहोष झाले होते.

अंतःकरणांतल्या आनंदाच्या भावना गाण्यांत मिसळून गवई आतां गाणें गाऊं लागला.

—गातांना त्यानें आपली टोपी काढून ठेविली होती.

—मालक आले. अगदीं गवयाजवळ आले !

—त्यांनीं एकदां गवयाकडे पाहिलें आणि एकदां जमलेल्या लोकांकडे पाहिलें— आणि जमलेल्या लोकांच्या अधीरतेची घटका निर्माण झाली !

—आणि— आणि—

—मालकांनीं एक मोठा थोरला सुस्कारा सोडला !

—जमलेल्या लोकांनीं मालकाला साथ केली !

—पुन्हा एकदां मालकांनीं गवयाकडे आणि जमावाकडे पाहिलें.

—काय चमत्कार होतो तें पहाण्याकरितां लोकांनीं आपला श्वास आवरून धरला.

—आणि एक मिनिट—

—दुसऱ्या मिनिटाला जिकडून तिकडून टाळ्यांचा गजर झडूं लागला.

—किती वेळ ?

—जवळ जवळ दहा मिनिटें !

सर्व लोक आश्चर्यचकित 'आदरानें' मालकांकडे पाहूं लागले.

गवई सुद्धां मनांतल्या मनांत हतबुद्ध झाला होता !

'अखेर मालकांनींच चढाओढ जिंकली. सध्या रसिकतेचंच वारेमाप पीक आलं आहे जगांत !' गवई मनांतल्या मनांत म्हणाला.

—भावना ! भावना !!

—अखेरशेवटीं मालकांनीं भावनेच्या जोरावर लोकांना जिंकलें.

—मालकांनीं आपल्या डोक्याची टोपी काढून गवयाच्या डोक्याला घातली होती !

—ती टोपी जरी खादीची होती तरी त्याला भावनेचें केवढें मोठें सुवर्ण होतें !

—लोक कां हतबुद्ध होणार नाहींत ? गवयानें कां हतबुद्ध होऊं नये ?

—कां होऊं नये, तें मला शेवटीं समजलें.

—लोक आपआपल्या घरोघर जाऊं लागले होते.

एक म्हणत होता, "मालकांनीं दहा हजार रुपये जरी गवयाला दिले असते तरी त्या टोपी देण्याच्या पाठीमागें जी भावना आहे तिची सर त्या दहा हजारांना येणार नाहीं !"

आणि बाकीचे लोकही निरनिराळ्या शब्दांत हेंच बोलत चालले होते.

—आणि नंतर कितीतरी वेळानें गवई बाहेर पडला.

गवयानें सर्व लोकांना अगोदर बाहेर जाऊं दिलें. तो खरोखरच अंतःकरणापासून मालकांच्या आदरानें घामेजला होता. सर्व लोक गेल्यानंतर मालकांना त्यानें एकटें गांठलें. मालकांच्या पायांना त्यानें हात लावून नमस्कार केला.

आणि मग पुन्हा दोघांमध्यें शब्दांची झोंबाझोंबी सुरू झाली.

"अहो ! तुमचा गुणच तसा आहे !" मालक साळसूद केविलवाणा चेहरा करीत म्हणाले.

"अहो पण रसिक कुठं आहेत ?" गवई विव्हळला.

—"छेः छेः ! अगदीं अलौकिक आहे आपला गुण— आम्हांला अभिमान वाटतो–"

"आणि आपल्या रसिकतेचा अभिमान कुणाला वाटणार नाहीं ? आणि इतके भावनाप्रधान ! अहो, स्वतःच्या डोक्याची टोपी म्हणजे देवळाचं शिखर समजा कीं !" आणि येवढें म्हणून, मालकांनीं त्याच्या डोक्याला घातलेली टोपी पुन्हा एकदां आपल्या डोक्यावर

चापून चोपून बसवून व स्वतःच्या टोपीनें वारा घेत घेत 'उणीव रसिकांचीच परी–' हा चरण गात गात व ताना घेंत घेत गवई आपल्या घराचा मार्ग आक्रमूं लागले !

* * * *

गवई घरीं पोचण्याच्या अगोदरच कामगार "मालक आणखी काय म्हणत होते" हें विचारण्याकरितां गवयाच्या घरीं अगोदरच येऊन बसले होते.

—गवई आले.

—जमलेल्या सर्वत्रांनीं त्यांची वाहवा केली.

—अर्थात् गवयानें घरांत चहा करायला सांगितला !

कधीं नव्हे ते आज सर्व कामगार मालकांबद्दल मनापासून चांगलें बोलत होते. आणि सर्वांचा बोलण्याचा सारांश असा होता असें आपण समजूं या कीं मनुष्य कितीही स्वार्थी व थोताण्डी असला तरी माणसाजवळ अंतःकरण म्हणून जी चीज परमेश्वरानें ठेविली आहे ती वर्षभरांत पावसाळ्यांत चमकणाऱ्या विजेप्रमाणें केव्हांतरी एकदां प्रकाशतेच !

—पण प्रकाशणारी विज आभाळांत जोंपर्यंत चमकत असते तोंपर्यंतच तिचें कौतुक आणि शोभा; आणि तीच पहाणाऱ्याच्या नेमकी समोर येऊन आदळली तर ?

—तर काय होतें तें जमलेल्या लोकांना लगेच कळलें !

ते अगदीं आनंदानें, तल्लीनतेनें बसलेले असतांनाच एक मनुष्य तिथें आला.

"काय रे ?" गवयानें कुतूहलानें विचारलें.

"थोडं खाजगी काम आहे !" तो मनुष्य लाजेनें अर्धमेला

होऊन म्हणाला.

"अरे! खाजगी वगैरे कसलं आलं आहे आतां! काय असेल तें सांग इथंच–"

"माझी आपणांला एक विनंति आहे." तो कमालीच्या नम्रतेनें म्हणाला.

"अर्ज, विनंति काय वाटेल तें असूं दे!" गवईबुवा रुबाबांत म्हणाले.

आणि तो आलेला मनुष्य रडक्या आवाजांत म्हणाला, "सर्व कांहीं आपल्या हातीं आहे आतां– आपल्या मर्जीवर अवलंबून आहे आतां–"

"अरे लेका," गवईबुवा रुबाबांत म्हणाले, "म्हणजे काय मालकांनीं गिरणी माझ्या नांवानं करून दिली कीं काय आज? काय रे लेका माझ्या हातांत आहे?"

"मालकांनीं आपल्याला समारंभांत दिलेली टोपी मला देणं न देणं!"

"–लेका– तुला कशाबद्दल देऊं ती टोपी?" गवईबुवा रुबाबांत म्हणाले.

"कारण ती माझी आहे म्हणून!" त्या माणसाला वर पहातांच येईना.

आणि गवईबुवांना त्याच्या म्हणण्याचा अर्थच समजेना. तो कशातरी रीतीनें समजला तर पहावा म्हणून त्यांनीं डोक्याची मालकांनीं दिलेली टोपी काढून हातीं घेतली.

—किती स्वच्छ होती ती टोपी!

"लेका इतकी स्वच्छ टोपी तुझी रे कशी?" गवयानें पुरावा

मागितला.

"आजच्या समारंभाकरितां मीं मुद्दाम आणली परटीहून !"

"लेका, खोटं बोलतो आहेस—" गवई ओरडला. कारण ती टोपी त्या आलेल्या मनुष्याची ठरण्यानं त्याचा मालकांबद्दलचा आदर नाहींसा होणार होता आणि तें त्याला होऊं नयेसें वाटत होतें !

गवयानें ती टोपी उलगडून पाहिली आणि त्याची खात्री पटली कीं ती टोपी त्या आलेल्या मनुष्याचीच होती !

कारण ती टोपी उघडतांच तिच्या घडींतून दोन विड्या— त्यांतील एक जळकी व एक सबंध— दोन काड्या व काड्यांच्या पेटीचा फक्त गुल असलेला एक तुकडा खालीं पडला !

"चल घेऊन जा लेका ही घाण !" आतांपर्यंत आदराची आणि कौतुकाची असलेली ती टोपी तिरस्कारानें त्या आलेल्या माणसाच्या अंगावर भिरकावीत गवईबुवा उद्गारले,

"पण कायरे लेका— मला मालकांनीं गाण्यावर खूष होण्याच्या निमित्तानें ही टोपी दिली पण— मालकाला ही तूं काय निमित्तानं दिलीस ? का ही टोपी मिळविण्याकरितां मालकांनींही तुला गाऊन दाखविलं एकान्तांत ? का— आणि कसा झाला हा चमत्कार ? कशी घातलीस तूं मालकांना टोपी ?"

"त्याचं असं झालं——" तो मनुष्य खालीं पाहूनच बोलत होता.

——आणि 'कसं झालं' तें लोक आपआपल्या जिवाचा कान करून ऐकूं लागले.

"मालक— सत्यनारायणाच्या पोथीला आले— ते नेहमींसारखे बोडकेच. त्यांनीं पाहिलं सर्वांनीं डोक्याला टोप्या घातलेल्या— मग बोडकं येणं त्यांना कसंसंच वाटलं पूजेंत ! मी असा होतों रस्त्यांतच

उभा– चोरून विडीचा झुरका घ्यायला. तोंच मालक माझ्याकडे पाहून सलगीनं हंसले आणि लाडानं माझ्या डोक्याची टोपी काढून त्यांनीं स्वतःच्या डोक्याला घातली. मी काय बोलणार? मी आपला अंधारांत लांबच उभा राहिलों. बोडका कसा येऊं पूजेंत ? मीं लांबून पाहिलं. तुमच्या डोक्याला मालकांनीं माझी टोपी घातलेली. म्हटलं घेऊं मागून नंतर! गवईबुवा आपलेच आहेत ! अहो, बोडक्यानं पूजेंत यायचं नाहीं म्हणून प्रसादही नाहीं मिळाला मला आज ! थोरामोठ्यांची सलगी अशी बाधते बघा—कधीं कधीं !"

सर्वांचा मालकांबद्दलच्या आदराचा उन्माद उतरला. त्या बिचाऱ्याची टोपी त्याला परत मिळाली. पण प्रसाद त्याला मिळायचा राहिला होता.

गवईबुवांनीं आपल्या खिशांतला प्रसाद काढला. त्यांत पुष्कळांनीं आपल्या खिशांतली भर घातली आणि गवईबुवा तो जमा केलेला प्रसाद त्या टोपीवाल्या माणसाच्या हातांत टाकीत म्हणाले, "भांड्याला दोन्ही बाजूंनीं जरी कल्हई केली तरी मूळ भांडं कसलं आहे हें प्रसंगानं लोकांना कळतंच कधीं तरी !"

---

# सुरवात आणि शेवट : : ३

केवढ्या तरी मोठ्या अशा एका भव्य दिवाणखान्यांत दोन माणसें बोलत बसलीं होतीं. त्यांपैकीं एक स्त्री होती आणि एक पुरुष होता. त्या दिवाणखान्याच्या चारही बाजूंच्या भिंतींना अनेक कपाटें टेकून उभीं होतीं. तीं सर्व कपाटें पुस्तकांनीं भरलेलीं होतीं. तें सर्व तऱ्हेचें वाङ्मय होतें; पण त्यांतल्या त्यांत ललितवाङ्मयाचीं पुस्तकें त्यांत जास्त होतीं !

त्या दिवाणखान्याच्या मध्यभागीं एक मोठें थोरलें राऊंड टेबल होतें आणि त्या टेबलाभोंवतीं कित्येक खुर्च्या होत्या. टेबलावर एक चहाचा सुंदर ट्रे होता. कप-बशांवर 'फरगेट मी नॉट' 'लव्ह मी' इत्यादि वाक्यें दिसत होतीं.

पण दिवाणखान्यांत माणसें फक्त दोनच होतीं.

एक स्त्री आणि एक पुरुष.

—अर्थात् तीं नवरा-बायको होतीं. नवऱ्याचें वय होतें पंचेचाळीस वर्षांचें. बायकोचें वय होतें पस्तिस-छत्तिसाच्या सुमारास.

त्या स्त्रीच्या देहावर ब्लाऊज, जॉर्जेटचें पातळ वगैरे जें काय असा-वयाचें तें होतें. मोडकळीस आलेलें व जवळ जवळ कामांतून गेलेलें फर्निचर पुनः थोडी डागडुजी करून व वार्निश करून नव्यासारखें करावं तशीं तीं दिवाणखान्यांतील नवराबायको दिसत होतीं.

इतक्यांत पुरुषानें एक मोठी थोरली जांभई दिली व म्हटलें, "सांपडला का तो मासिकाचा अंक ?"

स्त्रीनें चिडून म्हटलें, "नाहीं. मला पुनः पुनः असं खिजवण्यांत आपल्याला काय भूषण वाटतं ? त्या मासिकांतली ती गोष्ट तुम्ही मला कितीदां वाचायला लावणार ? ती गोष्ट मीं पुनः एकदां वाचली कीं माझ्या अंगांतलं कमींत कमी चार औंस रक्त कमी होतं !"

"खरं आहे– पण पुनः तें एक दोन दिवसांत भरून निघतंच ना ? पण ती गोष्ट तुझ्या तोंडून ऐकली कीं मला कांहीं काळ तरी नव-जीवन प्राप्त झाल्यासारखं वाटतं !"

"असं आपण म्हटल्यानंतर काय करावं माणसानं ?"

"गोष्ट वाचून दाखवावी !"

नंतर पांचदहा मिनिटें शान्तच गेलीं. तेवढ्या वेळांत समोरच्या घरीं एक सुंदर स्त्री पियानो वाजवूं लागली तो ऐकूं येऊं लागला. मागील दारीं रेडिओ सुरू झाला तोही ऐकूं येऊं लागला. डाव्या हाताच्या घरांत ग्रामोफोन वाजूं लागला तोही ऐकूं येऊं लागला. आणि उजव्या हाताच्या घरांत प्रत्यक्ष एक स्त्रीच गात होती तेंही ऐकूं येऊं लागलें.

इतक्यांत त्या स्त्रीनें मोठी थोरली जांभई दिली. त्या आवाजा-सरशी आजुबाजूचे सर्व आवाज एकदम बंद झाले आणि त्या स्त्रीनें नवऱ्याला कांहीं काळ नवजीवन प्राप्त करून देणारी ती गोष्ट

वाचायला सुरुवात केली !

* * *

--असें त्या गोष्टींत काय रहस्य होतें ?

"--पहाटेचा मंद मंद वारा वाहत होता. आकाशांत चांदणें अद्यापही चमकत होतें. आपला पराभव होणार हें माहीत असतांनासुद्धां एखाद्या किरकोळ सैन्यानें जिवाच्या करारानें शत्रूला तोंड देऊन मरून जावें त्याप्रमाणें सूर्यप्रकाशापुढें आपल्याला निस्तेज व्हावें लागणार हें माहीत असतांनासुद्धां तें पहाटेचें चांदणें सूर्योदयाशीं टक्कर देण्याच्या इराद्यानें अट्टाहासानें अजून थांबलें आहे असें वाटत होतें !

अशा वेळीं पंजाब मेलमधल्या सेकंड क्लासमधून एक तरुण आणि एक तरुणी प्रवास करीत होतीं.

रात्रीं साडेनऊ वाजल्यापासून त्यांच्या प्रवासाला सुरुवात झाली होती; आणि आतां पहाट झाली होती तरीही त्यांचें बोलणें अद्याप चालू होतें. कारण त्या डब्यांत दुसरें कोणीच नव्हतें हें एक आणि दुसरें कांहीं तरी ! --दोघांच्याही डोळयांवर निद्रादेवी आपला अम्मल बसवूं पाहात होती, पण--

-- पण त्यांचें कांहीं प्रेमकूजन चाललें नव्हतें. एकंदर परिस्थितीचा जागतिक दृष्टीनें त्यांचा विचार चालला होता. चालू असलेल्या राजकीय चळवळींत कोणाकोणाचें नेमकें काय चुकतें आहे तें त्या दोघांनीं नेमकें ओळखलेलें दिसत होतें.

"चंद्रिके, मीं तर आतां देशकार्याकरितां आयुष्य बळी द्यायचं ठरवलंच आहे, पण तुझा काय विचार ?"

"नाथ, प्रियकराच्या इच्छेविरुद्ध कोणत्या प्रणयिनीचे विचार

असतील ? पण खरं सांगू का ? आपल्याइतकं धाडस माझ्याच्यानं कसं होणार ? मी फार फार तर आपल्याशीं लग्न करूं शकेन !" चंद्रिका कांहींशी हसून व पुष्कळशी लाजून म्हणाली. आणि एकी-कडे तिच्या कपाळावरील लोंबत्या केसांशीं वायुराज खेळत होता त्या खेळांत ती आपल्या एका हातानें सामील झाली आणि दुसऱ्या हातानें वायुलहरीवर स्वतःच्या देहावरील फडफडणारा पदर ती सावरूं लागली !

"चंद्रिके !" तो तरुण म्हणाला. त्याचें नांव चकोर होतें. "आज तुझा पदर असा बेफाम डौलांत वाऱ्याशीं कां खेळत आहे ? पदराला आज पिन्स लावल्या नाहींस वाटतं ?"

"लावल्या होत्या तर काय झालं ! पण वारा सुटला तशा काढून टाकल्या !" ज्याचें वर्णन करतां येणार नाहीं इतका एक तल्लख मुरका मारीत व एकीकडे लाजत आणि एकीकडे हसत चंद्रिका म्हणाली.

या वेळीं चकोर चंद्रिकेकडे किती एकतानतेनें पाहत होता ! वारा सुटल्याबरोबर पदराच्या पिन्स काढून टाकण्यांत चंद्रिकेनें दाख-विलेली हळुवार रसिकता चकोराच्या रोमरोमांतून आनंद निर्माण करीत होती !

"लग्न ? विवाह ? मॅरेज ? चंद्रिके, माझ्याशीं तूं लग्न करणार ? अहाहा ! या कल्पनेनं मला इतका उन्माद आला आहे कीं या धावत्या पंजाब मेलमधून अशीच उडी टाकन कोणत्या तरी सत्या-ग्रहांत सामील व्हावं-- बेडर डौलानं तिथं होणारा लाठीहल्ला आपल्या अंगावर घ्यावा आणि त्यांत जखमी होऊन तुझ्या मांडीवर येऊन लगोलग विव्हळत पडावं ! असं झालं तर माझ्या भाग्याचा कोण

हेवा करणार नाहीं ? प्रत्येक तरुण हुरुपानं चौकशी करूं लागेल कीं अशी चंद्रिका कुठं आहे ती दाखवा आणि लगेच सत्याग्रहाचा लाठीहल्ला कुठं आहे तोही सांगा ! चंद्रिके—चंद्रिके—"

चंद्रिका घाबरण्याचा अभिनय करीत म्हणाली, "चकोरा, थट्टा पुरे करा. आयुष्याकडे पुन्हा एकदां गंभीरपणानं पाहण्याचा प्रयत्न करावा गडे !"

"आतां– आतां कसं शक्य आहे ? मुतक्यासारखं गंभीर होणं आतां मला जमणार नाहीं ! आयुष्य म्हणजे आनंद–मौज–हसणं !" चकोर मिटक्या मारीत म्हणाला. "अग हा पहाटेचा विनोद आहे– आतां कांहीं क्षणांनीं सूर्योदय होईल. उजाडत्या सूर्याला हंसत खेळत सामोरं जाणं—"

"पण रात्रभर जागरण केल्यामुळें सूर्य उगवल्यावर आपण झोपींच जाणार आहोंत" असें म्हणत चंद्रिकेनें आपल्या अंगावर पांघरूण ओढून घेतलें आणि ती झोपीं गेली !

—नंतर चकोर उठला. त्यानें आपलें सामान नीट तपासून पाहिलें; कारण त्यांत एकदोन बॉम्ब् होते. चकोर दहशतवादी राजकारणाचा पुरस्कर्ता होता.

—त्यानें ते बॉम्ब् कोठून आणले होते ?

—आणि त्यांचें तो काय करणार होता ?

* * *

चकोर हा सुरुवातीला एक तेजस्वी तरुण होता. आयुष्याचा गंभीरपणानें विचार करण्याची त्याला पहिल्यांदा संवय होती. आजूबाजूची असमाधानी परिस्थिति त्याला डांचत होती. तो खूप शिकलेला होता. रूपानें अत्यंत देखणा. आजूबाजूच्या लोकांवर नजरेच्या

एकाच फिरतीनें कदर निर्माण करणारी दृष्टि. कोणालाही तो नेहमीं हवाहवासा वाटे.

त्याचे स्नेहीसोबती खूप श्रीमंत होते. चकोर हा अत्यंत गरीब परिस्थितींतला. त्याचें शिक्षण स्नेह्यांसोबत्यांच्या मदतीनेंच होत होतें. तो स्वतः अभ्यासांत अत्यंत हुषार होता. तो आपल्या स्नेह्यांना अभ्यासांत मदत करी आणि त्यामुळें त्याचे स्नेही-सोबती त्याचा योगक्षेम चालवीत.

पुढें त्याचें शिक्षण संपलें. आणि त्याच वेळेला त्याला देश-प्रेमाची झुळूक लागली. त्यामुळें संसाराच्या मार्गाला न लागतां तो देशसेवेच्या मार्गाला लागला.

तरुणांच्या चळवळींत तो हिरिरीनें सामील झाला. त्याचें वक्तृत्व-सुद्धां मोह घालणारें होतें.

तो शिकत होता तेव्हां ठीक होतें. पण देशसेवेंतही त्याचें जीवन स्नेह्यां-सोबत्यांवर अवलंबून होतें. आणि स्नेही-सोबती देशकार्यांत पडले नव्हते. तेव्हां चकोराचें खाजगी आयुष्य स्नेह्यां-सोबत्यांच्या संगतीनें थोडेंसें चैनीकडे झुकत चाललें होतें !

आतां एखाद्या सभेंत बोलतांना थोडी तरी निशा केल्याशिवाय तो हुरूपानें उभा राहूं शकत नव्हता ! आतां त्याची भाषा तिखट होत चालली होती आणि वृत्ति मात्र सादळत चालली होती !

—आणि चंद्रिका— एक रत्न होतें. ती घरची श्रीमंत होती. खूप शिकलेली होती. देशसेवेबद्दल तिला विशेष आस्था नव्हती; पण तळमळीच्या देशसेवकाबद्दल तिला फार आस्था वाटे. अशा एखाद्या देशभक्ताच्या जीवनाला पाणी घालावें, त्याच्या आयुष्याला साद द्यावी—आपलें तन-मन-धन तिथें अर्पावें असें तिनें ठरवून

टाकलें होतें.

—एक दिवस चकोराची आणि चंद्रिकेची गांठ पडली. दोघेंही एकमेकांकडे पहिल्याच दृष्टींत आकर्षिलीं गेलीं आणि त्याच क्षणापासून तीं एकमेकांवर भक्तिभावानें 'प्रीत' करूं लागलीं.

हळद आणि चुना एकत्र झालीं कीं जसा तांबडा रंग तयार होतो त्याप्रमाणें प्रियकर आणि प्रेयसी एकमेकांना भेटल्यानंतर 'ध्येया'शिवाय दुसरें काय निर्माण होणार ?

चकोर चंद्रिकेकरितां वाटेल तो त्याग करायला तयार होता. चंद्रिकाही चकोराकरितां वेळीं अवेळीं वाटेल तेव्हां आपल्या प्राणाचें मोल द्यायला तयार होती.

पण एक दिवस चंद्रिकेनें चकोरला म्हटलें, "आपण फार गंभीरपणानें प्रत्येक गोष्टीचें विवरण करतां— त्यामुळें ऐकणाराच्या डोक्याला शीण आणि अंतःकरणाला वेदना होतात! आपणाला राजकारण विनोदी भाषेंत नाहीं का सांगतां येणार? गंभीरतेचं मर्म थोड्यांना कळेल— पण गुदगुल्या कुणालाही होतात!"

"खरंच चंद्रिके, पाहतों मी उद्यांपासून तसा प्रयत्न करून!" एकमेकांकरितां एकमेक जिथें प्राण द्यायला तयार होतीं, तिथें गंभीरपणाऐवजीं हसरेपणा आणि एका पक्षाऐवजीं दुसरा पक्ष प्रियकरणीच्या आग्रहाकरितां बदलायला कोणता ध्येयवादी तरुण तयार होणार नाहीं?

—नंतर चकोर तसा प्रयत्न करूं लागला आणि त्यांत त्याला झटकन् यशही आलें. आणि—आणि त्यानें हातोहात राजकारणाचा विनोद करून टाकला!

—पण त्याची खरी अंतःकरणप्रवृत्ति गंभीर होती. ती कुठें

अशानें नाहींशी होणार होती ? पण लोकच त्याला आतां गंभीर-पणानें बोलूं द्यायला तयार नव्हते !

—आणि तें त्याला डांचत होतें. लोकांना खेळवतां खेळवतां अखेर लोकच आपल्याशीं खेळूं लागल्याचें पाहून तो भयंकर चिडला होता !

पण चकोर अंतःकरणाचा खरा काय आहे हें पूर्णपणें ओळख-णारे कांहीं लोक होते. ते लोक लोकांना माहीत नव्हते. कारण ते सशस्त्र क्रांतीचा पुरस्कार करणारे होते. त्यांनीं चकोराला आपल्या विश्वासांत घेतलें होतें. चकोर त्या विश्वासाला पूर्ण पात्र होता. त्याच्या अंतःकरणाची खरी भूक त्या कार्यांतच शान्त होणार होती.

—आणि आज तो जो प्रवासाला निघाला होता तो केवळ अनिच्छेनें निघाला होता !

त्या सशस्त्र क्रांतिकारकांच्या टोळीचा पोलिसांना संशय आला होता. ह्याचा सुगावा त्या टोळीलाही लागला होता. तेव्हां त्यांनीं आपल्या एका हस्तकामार्फत कांहीं बॉंब् व कागदपत्रें चकोराकडे आणून पोहोंचतीं केलीं होतीं आणि तें सर्व हलाहल बरोबर घेऊन चकोर आज प्रवासाला निघाला होता.

  

या वेळीं चंद्रिकेनें आपल्याबरोबर असूं नये असें चकोराला वाटत होतें. पण चंद्रिका तें ऐकायला तयार नव्हती. आणि अखेर दोघेंही प्रवासाला निघालीं.

गोष्टीच्या सुरुवातीच्या रात्रीं साडेनवापासूनचा पंजाब मेलमधील सेकंड क्लासमधला तरुणतरुणींचा प्रवास तो तोच होता !

चकोरचा जीव धागधुगत होता. आणि तें चंद्रिकेपासून लपविण्या-

करितां तो विनोदाच्या आणि कोट्यांच्या आतषबाजीनें चंद्रिकेपासून आपलें मन लपवीत होता ! चकोरानें एक मात्र शहाणपणा केला होता कीं, आपल्याबरोबर असे बॉंब् आहेत हें त्यानें चंद्रिकेला कळविलें नव्हतें.

चकोरानें बरेच दिवस प्रवासांत काढले आणि अखेर तो परत आला. आल्यावर त्याला कळलें कीं ती क्रांतिकारकांची टोळी सरकारनें पकडली होती आणि चौकशीविना अटकेंत ठेविली होती !

—चंद्रिकेनें आतां लग्नाचा ध्यास घेतला होता; पण तिच्या घरचीं माणसें तिला चकोराबरोबर लग्न करायला परवानगी देईनात ! ती बापाची एकुलती एक होती. तरी तिचे चुलते-मामा-मावशी-काका सर्व तिच्या लग्नांत आडवे पडले.

—आणि यांचा परिणाम असा झाला कीं चंद्रिकेचें घराबाहेर पडण्याचेंही स्वातंत्र्य तिच्या घरच्या लोकांनीं हिरावून घेतलें !

हाय ! हाय ! !

—इकडे चकोर विव्हळूं लागला !

—तिकडे चंद्रिका निस्तेज होऊं लागली.

—आणि नेमकी त्याच वेळेला गांवांत मिठाच्या सत्याग्रहाची मोहीम निघाली !

—दारुण निराशेनें चकोर त्या सत्याग्रह-मोहिमेंत सामील झाला. येवढेंच नव्हे तर आघाडीवर दाखल झाला.

खूप गर्दी जमली होती तिथं. लोकांची आणि पोलिसांची ! अखेर पोलिसांनीं लाठी चालू केली !

गरीबगुरीबांवर पोलिस लाठी चालवूं लागले.

चकोरला तें दृश्य सहन होईना ! आपले क्रांतिकारक मित्र

कैदेंत पिचत पडले आहेत, आपली प्राणप्रिया चंद्रिका घरीं विव्हळत पडली आहे— आणि आपण ?

—तो एकदम पुढें झाला.

—पोलिसांची लाठी त्याच्या देहावर चालली.

—तो मटकन् खालींच बसला ! आणि आजूबाजूला कावरा-बावरा पाहूं लागला.

—इतक्यांत त्याला एक नाजूक किंकाळी ऐकूं आली.

चंद्रिका आपल्या सर्व आप्तेष्टांची नजर चुकवून त्या सत्याग्रह-मोहिमेंत आली होती. तीही पोलिसांच्या लाठीहल्ल्यांत सांपडली !

—मुद्दाम का चुकून राम जाणे !

आणि नंतर चंद्रिका जी तिरीमिरीनें खालीं कोसळली ती नेमकी चकोरच्या मांडीवर !

हाय ! हाय !!

वाः ! वाः !!

—चंद्रिकेचें पुढें काय झालें ?

* * * *

गोष्ट इथेंच संपली. गोष्ट वाचून होतांच नवऱ्याला नवजीवन मिळाल्यासारखें वाटलें.

तो हुरुपानें म्हणाला, "मला वाटतं तूं गोष्ट पुरती आणि होती तशी वाचली नाहींस !"

स्त्रीनें खिन्नपणानें म्हटलें, "मधली ध्येयाची आणि तत्त्वाची चर्चा वगैरे मीं मुद्दाम सोडली, परिस्थितीचीं व्याख्यानं नाहींशीं केलीं आणि चकोरचंद्रिकेचे खरे स्वभाव दाखविणारीं कांहीं वाक्यं मीं पदरचीं घातलीं !"

"कां ?"

"मला वाटलं म्हणून !"

"अशा गोष्टी आपण नेहमीं वाचतों आणि ऐकतों आणि मनाची करमणूक करून घेतों— पण त्या किती खोट्या असतात नाहीं ?"

"—कां–अशा कोणी चकोरचंद्रिका प्रेम करीत नसतील ? अशीं कोणी ध्येयवादी नसतील ? प्रेमनिराशेनें खच्ची होणारीं नसतील ?"

"नसतील असं मी म्हणत नाहीं. पण चकोराला पहिल्यांदा चंद्रिकाच दिसली असेल किंवा पहिल्यांदा चंद्रिकेला चकोरच दिसला असेल, हें खरं नाहीं वाटत मला ! चकोर हा जर इतका चांगला होता तर काय त्या गांवांतल्या एकट्या चंद्रिकेलाच तो प्रथम प्रेम करण्यासारखा वाटला ? मी असं सुद्धां कबूल करायला तयार आहें कीं चकोरच्या बाबतींत तसं झालंही असेल ! पण चंद्रिका ही प्रेम करण्यालायक मुलगी आहे हें फक्त चकोरलाच कळावं हें शक्य नाहीं वाटत मला ! मोठी अगडबंब यादी असेल तिच्यावर प्रेम करणारांची आणि त्या यादींतून फक्त चकोरला चान्स मिळाला येवढं फार तर कबूल करतां येईल !"

"बरं तसंहि असेल—!"

"असेल म्हणजे काय ? असायलाच पाहिजे ! ध्येयाच्या अगोदर व्यवहाराची कात्री फिरून इकडे चकोर आणि तिकडे फक्त चंद्रिका राहिली असेल आणि मग जसं घर बांधून झाल्यानंतर त्याला रंगसफेती करतात त्याप्रमाणें ध्येयाच्या चिठ्या आणि बाशिंगं त्यांनीं आपल्या आयुष्याला चिटकवलीं असतील ! अर्थात् हें सगळं गोष्टींत सांगतां येणार नाहीं ! पण गोष्टींत न लिहिलेलं तरुण वाचकांनीं वाचायला शिकायला पाहिजे ! नाहीं तर पहिल्यांदा मनांत

भरेल तो चकोर आणि पहिल्यांदा भुरळ घालील ती चंद्रिका आणि तिथं अपयश आलं कीं प्रेमनिराशा ! दुःख ! सूड ! आत्महत्या !! वगैरे. कादंबरी-गोष्टींसारखा व्यवहार असत नाहीं ! कादंबरी-गोष्टींत जें लिहिलं आहे त्यापेक्षां तंत्रामुळं त्याहायचं काय राहिलं आहे आणि कशाची अतिशयोक्ति केली आहे हें जर लोक वाचण्याचा प्रयत्न करतील तरच वाङ्मय वास्तववादी ठरण्याची आशा आहे !"

"पण हा वाद पाहिजे कशाला ?" पत्नीनें विचारलें. पण हें विचारतांना तिनें मुरका मारला नाहीं, पदर सावरला नाहीं आणि तसें तिनें करावें अशी नवऱ्याचीही इच्छा दिसली नाहीं. कारण त्यांचें लग्न होऊन किती तरी वर्षें झालीं होतीं.

पत्नीनें पुढें म्हटलें, "पण आतां माझ्या प्रश्नाचं उत्तर द्या हं ! ही गोष्ट आपल्याला क्षणिक कां होईना, नवजीवन देते ना ? या गोष्टींत ते दोन बॉम्ब आणून लेखकानं काय साधलं ?"

"त्यांत त्यानं एक मोठं थोरलं सत्यदर्शन दाखविलं आहे. चळवळीची पार्श्वभूमि असलेल्या गोष्टी आणि कादंबऱ्या वाचून असं नाहीं का वाटत कीं त्या चळवळी देशाकरितां निर्माण झालेल्या नव्हत्या तर केवळ त्या कादंबरी-गोष्टींत सांपडलेल्या तरुण-तरुणींना प्रेम करायची सोय व्हावी आणि सवड सांपडावी येवढ्यापुरत्याच त्या चळवळी निर्माण झालेल्या होत्या ? लेखकाला चळवळ सांगायची नसते ! प्रेम सांगायचं असतं— आणि त्यांतील चळवळ म्हणजे त्या प्रेमाचं केवळ 'बॅकग्राउंड म्युझिक' असतं !"

"आणखी काय काय वाटतं ?" समोरच्या टेबलावरील एक कपबशी मुद्दाम खालीं फेकून त्याचे तुकडे करीत पत्नीनें विचारलें.

ते कपबशांचे तुकडे गोळा करीत नवरा म्हणाला, "लेखक हा

कलावन्त प्राणी असतो. एखाद्या झाडाचं पान त्याला कुजलेलं सडलेलं दिसतं, तेव्हां तो कलावन्तपणानं समग्र झाड वाचकांना न दाखवितां समाजाचं प्रतीक म्हणून तेवढं किडलेलं पानच वाचकांना दाखवितो. तेव्हां मी म्हणतों, त्या किडलेल्या पानापाठीमागचं झाड लोकांनीं कल्पनेंत पाह्यला शिकायला पाहिजे. आपला समाज वाङ्मयांत जितका किडला आहे तितका सृष्टींत नाहीं असं माझं प्रामाणिक मत आहे. याच्या उलट कांहीं लेखक हातीं न येणारीं दुसऱ्याच झाडाचीं फुलं आपल्या समाजवृक्षावर चिकटवून दाखवितात. तेव्हां तीं आपल्या झाडावरचीं फुलं नाहींत हेंही ओळखायला आपण आतां शिकलं पाहिजे. तें दाखविलेलं फूल आपल्याला आवडलं असेल, —पण—"

"मला आतां फिरायला जायचं आहे!" पत्नीनें तिरसटपणानें म्हटलें.

"अच्छा! जाव! मी पुनः वाङ्मयांत डोकं खुपसून बसतों!"

"आपण येणार नाहीं माझ्याबरोबर?"

"नो!" नवऱ्यानें इंग्लिशमध्यें 'नाहीं' म्हटलें.

"व्हाय्?" पत्नीनें आपल्यालाही इंग्लिश येतें हें दाखवीत म्हटलें.

"त्याचं कारण— यश हा आयुष्यांतला अपघात आहे आणि अपयश हें माणसाचं जीवन आहे. लाडके, वाङ्मयाच्या संसारानं अजून लग्नापुढं प्रवास केलेला नाहीं! नायक-नायिकेचं लग्न झाल्यानंतर त्यांच्या आयुष्यावर यशाची पाटी लागते आणि आपण शान्तपणानं पुस्तक मिटतों. पण पुढचं त्यांचं अयशस्वी जीवन— एका चळवळींत एक बायको मिळवून नायक थंडावलेला असतो! पुनः त्याला दुसऱ्या चळवळींत पडायचं असेल तर त्याला दुसऱ्या

बायकोचं आमिष नको का ? आणि तें आमिष जर त्याला परिस्थितीनं अशक्य असेल—तर जें मिळवायचं आहे तें एका पहिल्याच चळवळींत मिळविल्यानंतर तो लेकाचा पुनः दुसऱ्या चळवळींत पडतोच कशाला ? तेव्हां लग्न आणि राजकारण यांची सांगड होतां होईल तों घालूं नये. लग्न हें कौटुंबिक सुखाकरितां —त्याचा सार्वजनिक आयुष्याशीं काय संबंध ?"

"मला आतां कंटाळा आला आहे ! आपलंच आयुष्य आपण बोलतों आहोंत. मला ती गोष्ट किसळवाणी वाटते. म्हणून तो अंक मीं सांदीकोपऱ्याला टाकून दिला होता. आतां तर मी तो फाडून टाकणार आहें !"

"कां बरं आतां ? आपल्या पूर्वायुष्यावर आपल्या आतेमामेभावाकडून गोष्ट लिहून घेऊन ती प्रसिद्ध करतांना किती हुरूप वाटला आणि आतां त्याचे परिणाम पाहायला कां चीड आली ? गोष्टींतल्या चंद्रिके, तुझं माझं लग्न झाल्यापासून या तुझ्या चकोराला कोणत्याही चळवळींत पडण्याचा हुरूप राहिला नाहीं. तूं उरूंही दिला नाहींस. आयुष्यांतले सर्व भडक रंग लग्नाच्या सुमारासच वापरून टाकल्यानंतर आयुष्याचा चोथा किती लौकर हातीं येतो हें त्या बिचाऱ्या लेखकाला— तुझ्या आते-मामे-भावाला— समजावून द्यायला पाहिजे ! कुठं आहेत हल्लीं आपले बंधुराज ?"

"हं—ती आणखी आठवण काढलीत का ? बिचाऱ्याचं अंतःकरण चांगलं पण चेहरा विद्रूप ! त्याच्या काव्यकल्पना कोणतीही तरुणी ऐकूनच घेइना तेव्हां त्या कुणाला कळणार कशा ? बिचारा आतां लांब रेघेपुढं —स लिहून कविता करीत हिंडत असतो गांवांतून ! आणि निराशेनं कादंबऱ्यांत, गोष्टींत प्रेमाचं गूढगुंजन करतो

आहे ! समाजाच्या नांवानं किंचाळतो आहे ! हरहर ! असं वाटायला लागतं कीं वाङ्मय म्हणजे शोभेची दारू आहे ! स्वप्नसृष्टि आहे ! मनांतली मळमळ आहे—"

"पण अंतःकरणांतली खळबळ नाहीं !" नवऱ्यानें गंभीरपणानें वाक्य पुरें केलें. "लेखक हा वाचकांचा खुशमस्कऱ्या आहे असं बिचारा विनाकारणच समजतो. वाचकांची खुशमस्करी करून हास्यरसाच्या, शृंगाररसाच्या शुगरमध्यें आपण विचारांचं कोयनेल देतों अशी समजूत करून घेतो. पण लोक आतां इतके शहाणे झाले आहेत कीं ते फक्त वाङ्मयावरची साखर खाऊन जातात—आणि कोयनेल खालींच राहतं. अग, हें माणसाचं झालं. उंदीर तरी हल्लीं त्यांना घातलेल्या गोळ्या कुठं फारशा खातात ? मग माणसांचं काय ? ती तर बोलूनचालून शहाणी जात !"

"तें सगळं खरं, पण वाङ्मय आशावादीपणानं नको का लिहायला ? एकदम खरं बोललेलं कुणाला चालेल ? उद्यां मी तुम्हांला 'मूर्ख आहां' असं तोंडावर म्हटलं तर चालेल का ?"

"न चालायला काय झालं ? आपलं लग्न आतां इतक्या थरावर आलं आहे कीं तू काय म्हणशील तें चालेल ! कारण सर्व पैसा तुझा आहे. माझीं मतं मेलीं आहेत. आजूबाजूला मला तूं कुठं पाहूं देत नाहींस— पुनः चळवळींत पडेन तर ! पूर्वी मी व्याख्यान देत होतों. आतां फक्त तुझ्याबरोबर व्याख्यान ऐकायला जायचं नशिबीं आलं ! कारण काय तर मनासारखी बायको मिळाली ! आणि तुला फसवून पुनः प्रेम करण्याचं मॉरल करेज माझ्यांत नाहीं !"

"मॉरल करेज ! वेडंवाकडं वागण्याला हा शब्द लावून त्या शब्दाची विटंबना मात्र करीत आहांत ! ज्यांच्याविरुद्ध हें मॉरल

करेज दाखवलं जातं ते लोक आणि तीं मतं आतां इतकीं दुबळीं झालीं आहेत कीं एखाद्या व्यसनांत पडणं आणि करेज दाखविणं दोनही सारखंच झालं आहे! आणि लोकही हल्लीं इतके बेफाम सुधारले आहेत; ते तरुणांनीं कांहीं केलं तरी खिजतच नाहींत मुळीं. बरं, पण तें जाऊं द्या. इतक्या दिवस माझ्यापासून लपवून ठेवलंत; त्या क्रांतिकारक टोळीनं आपणाजवळ दिलेल्या बॉंबचं आपण काय केलंत—एकदां सांगून तरी टाका."

"तोच बेत आज मीं योजला होता" असें म्हणून चकोरानं चंद्रिकेचा हात धरला आणि तो तिला आपल्या घरामागच्या अंगणांत घेऊन गेला. पाठीमागें एक मोठें थोरलें तुळशीवृंदावन होतें. त्याकडे बोट दाखवीत आणि डोळ्यांतून अश्रू ढाळीत तो म्हणाला, "एक दिवस तूं गांवाला गेलेली असतांना मीं हें तुळशीवृंदावन उखडलं आणि त्याखालीं ते बॉंब आणि माझा जिवंतपणा पुरून टाकला— आतां आपण सांगितल्याशिवाय कुणाला कळणार आहे का कीं त्या छापील गोष्टींतला चकोर मी आणि चंद्रिका तूं म्हणून?— तें पूर्वायुष्य कुठं आणि हें नंतरचं निर्जीव आयुष्य कुठं? चंद्रिके, आयुष्यांतला आनंद पुरवून खाणं हें मोठं शास्त्र आहे! यश हा आयुष्यांतला अपघात आहे आणि अपयश हें माणसाचं जीवन आहे!"*

---

* ही लघुकथा पुणें येथें 'वसंतव्याख्यानमाले'त ता. १९।५।३९ रोजीं श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं सांगण्यांत येऊन तीवर चर्चा करण्यांत आली.

## वस्ताद : : : ४

सहा फूट उंचीच्या आरशांत पहात एक तरुण उभा होता. त्याच्या अंगांत फक्त एक गंजीफ्रॉक— तो घामानें भिजलेला, एक पंचा वेढून घेतलेला— तो तालमींतील मातीनें लाल झालेला. रोजच्या व्यायामानें शरीर पोलादी बनलेलें. गळयांत एक काळा गंडा. नुकतीच त्यानें तालीम केलेली असल्यामुळें अंग घामानें निथळत होतें. आणि एका टॉवेलानें घाम पुशीत और मिजाशीनें तो समोरच्या आरशांत पहात होता !

आरशांतल्या आपल्या प्रतिबिंबाकडे पाहून तो खुशीनें स्वतःचा स्वतःशींच हंसत होता. कारण नसतांनाच त्यानें आपल्या मिशांना पीळ दिला.

या वर्षीच तो बी. ए. झाला होता आणि सध्या तो एलएल. बी. च्या टर्म्स भरीत होता.

त्याचें नांव विनायक.

त्याला दोन भाऊ होते. एक थोरला आणि एक धाकटा.

आणि यावर तो म्हणे, मधला भाऊ होण्यांत जें भाग्य आहे तें

कांहीं और आहे. संसाराची जबाबदारी थोरल्या भावावर. हाताखालीं राबवायला धाकटा भाऊ ! आपण फक्त मनमुराद तालीम करणार ! दुधावरची साय उडविणार ! धाकट्या भावानें सायीखालचें दूध प्यावें. थोरल्या भावानें ताकावर गुजराण करावी !

त्याच्या थोरल्या भावाचें नांव होतें वासुदेव. पांच सहा वर्षांपूर्वींच या भावंडांचे वडील वारले होते. त्या वेळीं वासुदेवाचें शिक्षण पुरें झालेलें नव्हतें. पण वडिलांच्या नंतर आपण आपलें शिक्षण चालू ठेवलें तर धाकट्या भावांची कुचंबणा होईल या विचारानें त्यानें आपलें शिक्षण थांबविलें आणि नोकरीला सुरवात केली. वास्तविक वासुदेव हा अत्यंत बुद्धिमान् होता. त्याचें शिक्षण पुरें झालें असतें तर त्यानें नशीब काढलें असतें. पण धाकट्या दोन भावांकरितां त्यानें आपल्या कल्पनांवर पाणी सोडलें.

वासुदेव हा दिसायला तितका चांगला नव्हता. त्यानें कसाही पोषाख केला तरी तो नेभळट दिसे. लहानपणापासूनच तो रोगी होता. त्यामुळें त्याच्या मधल्या भावावर त्याचें अतोनात प्रेम बसलें होतें. कारण विनायक हा खूप गोरा, नाकीं डोळीं नीटस, डोळ्यांत भरण्याइतका— आणि आतां तर तालमीनें त्याच्या शरीराला पैलूच पडले होते. शिवाय बुद्धीनें तरतरीत. नापास होणें त्याला अजिबात माहीत नव्हतें. म्हणून वासुदेवानें ठरविलें होतें कीं विनायकाला वाटेल तितकें शिकवायचें. त्याला कांहीं कमी पडूं द्यायचें नाहीं. आणि हें वासुदेवाला तितकें शक्य नसतांना सुद्धां त्यानें अत्यंत निर्धारानें पाळलें होतें.

त्या भावांचें मालकीचें घर होतें. त्या घराच्या येणाऱ्या भाड्याचाही त्यांना पुष्कळच आधार होता.

पण विनायकानें एक दिवस कुरकुरत म्हटलें, "मला अभ्यासाला स्वतंत्र खोली हवी."

वासुदेवानें तेवढें ऐकलें मात्र. त्यानें दुसऱ्याच महिन्यापासून एक बिऱ्हाडकरू काढून विनायकाला अभ्यासाला स्वतंत्र खोली दिली आणि येणारी तूट भरून काढण्याकरितां त्यानें स्वतः एक शिकवणी पत्करली.

धाकटा भाऊ जो होता– नांव महादेव त्याचें– तो बुद्धीनें जरासा मंद होता. पण त्याचें घरकामांत आणि व्यवहारांत फार लक्ष असे. घरांत सर्वांचा साधारण असा समज झालेला होता कीं महादेवानें एखादी जिन्नस जेवढ्याला विकत आणली असेल त्याच्या खालीं ती जिन्नस कुठेंच विकत मिळणें शक्य नाहीं. त्यामुळें घरचा बाजारहाट, हिशोब वगैरे सर्व महादेवावर पडलें होतें. थोरल्या भावाचा नोकरींत आणि शिकवणींत इतका वेळ जाई कीं त्याला घरांत कांहीं पहायला सवडच नसे. आणि मधला विनायक मात्र चैनींत तालीम करून अभ्यासांत गुंग होता. आणि असें असूनसुद्धां विनायकाची मर्जी सांभाळण्याचाच सर्वजण प्रयत्न करीत.

—आणि विनायक यामुळें सदोदित गुर्मीत !

—तो घरांत कुणालाच मानीत नसे. तो वचके फक्त आपल्या थोरल्या भावाला. त्याच्या नजरेला नजर द्यायची मात्र तालीमबाज विनायकरावांची सुद्धां ताकत नसे.

पण याला विनायकरावांनीं एक सुंदर तोडगा शोधून काढला होता. ते मुळीं आपला थोरला भाऊ घरीं असेल तेव्हां त्याला टाळीतच ! वासुदेवाला खाजगीच नोकरी होती. त्यामुळें तो दुपारीं बाराला घरीं जेवायला यायचा. विनायकराव अगोदरच जेऊन बाहेर गेलेले

असायचे. रात्रींही ते भावाची पंगत टाळीत !

आणि आपल्याला कांहीं हवें लागलें कीं तेंसुद्धां थोरल्या भावाजवळ आईच्या मार्फत मागायचें किंवा महादेवाला त्याच्याकडे पिटाळायचें !

एक दिवस विनायकरावांनीं असेंच कांहींतरी थोरल्या भावाजवळ महादेवामार्फत मागितलें.

थोरल्या भावानें जरा जोरांतच विचारलें, "कां ? तूं कां आलास ? विनायक काय करतो आहे ?"

हें विनायकरावांना आपल्या खोलींतून ऐकायला आलें.

त्यांनीं झटकन् कोट चढवला आणि सायकलवरून ते बाहेर पडले.

त्यांना हवी असलेली जिन्नस संध्याकाळीं त्यांच्या खोलींत येऊन पडली होती.

त्याच दिवशीं विनायकरावांच्या आईनें म्हटलें, "विनायक, शोभतं का तुला हें ? तो तुझ्याकरितां, तुझ्या शिक्षणाकरितां, येवढं जिवाचं रान करतो आहे आणि तूं त्याच्यापुढें जायचं सुद्धां टाळतोस ? त्याला नसेल का वाईट वाटत अशानं ?"

सुपारीचें खांड दांतानें फोडीत विनायकराव उद्गारले, "मी मुद्दाम त्याला टाळतों वाटतं ? माझे मला स्वत:चे असे कांहीं उद्योगच नाहींत का ?"

"असतील. नाहीं म्हणत नाहीं मी. पण पांच मिनिटं सुद्धां तुला त्याच्याशीं बोलत बसायला सवड सांपडत नाहीं ! आज त्याला जरा बरंही नाहीं—"

"काय होतंय ?" विनायकरावांनीं जरा नाखुशीनेंच विचारलें.

"मला नाहीं माहीत. तुला तोंड असलं तर विचार जाऊन त्याला."

हें उत्तर ऐकून विनायकराव सर्दच झाले. ते पुष्कळसे थिजलेही. आज भावाला भेटल्याशिवाय आपल्याला गत्यंतर नाहीं असें त्यांनीं आपल्या मनांत ठरवलें, आणि त्या दृष्टीनें ते आपल्या मनाची तयारी करूं लागले.

रात्रीचे साडेदहा वाजून गेले होते.

वासुदेवराव अस्वस्थ चित्तानें अंथरुणावर पडले होते. त्यांची पत्नी त्यांचे पाय चेपीत होती. इतक्यांत ती बाजूला होऊन खालीं जाऊं लागली.

वासुदेवरावांनीं विचारलें, "कां ग ?"

"भाऊजी आले आहेत वाटतं !" जातांना तिनें दिवा मोठा केला आणि ती खालीं गेली.

वरमलेल्या चेहऱ्यानें पण एखाद्या मस्त हत्तीसारखे डुलत डुलत विनायकराव तिथें हजर झाले.

वासुदेवराव उठून बसले.

"काय रे विनायक ?"

विनायकरावांनीं उत्तरच दिलें नाहीं. आपण वर येण्याचे अगोदर आपली भावजय आपल्या थोरल्या भावाचे पाय चेपीत होती हें त्यांनीं पाहिलें होतें.

विनायकानें उत्तर दिलें नाहीं याबद्दल विषाद वाटण्यापेक्षां तो आपल्यासमोर आला याबद्दलच वासुदेवराव खूश होते. ते पुन्हा अंथरुणावर मनमोकळेपणानें आडवे झाले.

विनायकानें कांहीं न बोलतांच त्यांचे पाय चेपायला सुरवात केली. सबंध अंग रगडलें.

"विनायक ?"

"हूं !"

"जा आतां. अभ्यास असेल ना तुला—?"

विनायकरावांनीं कांहीं उत्तरच दिलें नाहीं– पण सुटकेचा श्वास टाकला आणि तालीमबाज जसे तालमींतल्या मारुतीच्या पायाला हात लावून त्याला गुर्मीत नमस्कार करतात व तोच हात आपल्या कपाळाला लावतात त्याप्रमाणें विनायकरावांनीं उठतां उठतां भावाच्या पायाला हात लावला. त्यांनीं एकदां भावाकडे पाहिलें. त्यांच्या डोळ्यांच्या कडा पाण्यानें ओल्या झाल्या होत्या. ते तसेच खालीं आले.

खालीं आई उभी होती.

"काय रे विनायक ?"

"कांहीं नाहीं. मी अभ्यासाला बसतों आतां."

कां कुणाला ठाऊक, आईला हसूं आलें.

विनायकराव तिथून नाहींसे झाले.

  

दुसऱ्या दिवसाची गोष्ट. विनायकराव आज अगोदर जेवले नाहींत.

"काय रे विनायक, पान वाढूं ना तुझं ?"

"नाहीं; आज मी उशिरां जेवणार आहें."

"कां रे ?"

"भूक नाहीं लागली अजून." स्वैपाकघरांतील डबे उघडीत त्यांत सांपडेल तें तोंडात टाकीत विनायकराव म्हणाले.

"आज वासुदेवाबरोबर जेवायचा विचार आहे वाटतं ?"

"हं!" विनायकरावांचें खाणें एकदम संपलें. ते स्वैंपाकघराबाहेर पडले.

दुपारीं भाऊ भाऊ जोडीनें जेवायला बसले. भावानें कांहीं विचारलेंच तर त्याचें फक्त 'हं' 'ऊंहूं' अशीं विनायकराव उत्तरें देत.

आणि त्या दिवशीं जेवतांना विनायकराव जेवणापेक्षां पाणीच फार प्याले.

दुपारीं वासुदेव नित्याच्या सवयीप्रमाणें आपल्या लहान मुलाला जवळ घेऊन आडवे झाले होते.

विनायकरावही तिथेंच जरा येऊन आडवे झाले.

भावासमोर आपण यायचें टाळीत होतों– तें आपण केलें; आतां फक्त त्याच्याशीं मनमोकळेपणानें बोलायचेंच राहिलें होतें आणि तेवढा समारंभ उरकून घेण्याकरितां विनायकराव भावाजवळ असे घोटाळत होते.

वासुदेवाचा डोळा लागला होता.

त्यांचा धाकटा मुलगा त्यांच्याजवळ खेळत पडला होता.

विनायकाला घरांतल्या लहान मुलांना रडविण्याचाही एक मोठा शोक होता.

विनायकरावांना कांहीं काम नसलें किंवा करमत नसलें कीं ते लहान मुलांच्या खोड्या काढून त्यांना रडवीत असत आणि याबद्दल त्यांना कुणी मोठें माणूस बोललें म्हणजे ते म्हणत, "पोरांना असं रडवून खिजवून मला गुंड करायचीं आहेत! आमच्या घरांतलीं पोरं नेभळीं साळसूद व्हायला नकोत!"

या तत्त्वज्ञानावर घरचीं माणसं गप्प बसत.

विनायकरावांनीं आतां निजल्यानिजल्या भावाजवळ खेळत

पडलेल्या मुलाला हळूच चिमटा घेतला.

विनायकरावांच्या खेळकर तत्त्वज्ञानाला न जुमानतां तें पोरगें रडायला लागलें.

वासुदेवराव जागे झाले आणि ते त्या पोराला थोपटूं लागले. आणि सहज त्यांनीं मान वळवून पाहिलें– त्यांच्या पलीकडच्या बाजूला विनायकराव होते, ते खुर्शीत येऊन हसत होते.

वासुदेवरावांनीं पुन्हा डोळे मिटले. पोरगें जरा स्थिर झालें. विनायकरावांनीं पुन्हा चिमटा काढला.

पोर रडूं लागलें. त्याला थोपटीत वासुदेवराव म्हणाले, "गप्प रे जरा विनायक—"

पण विनायकाला त्यामुळें खूपच मजा वाटली.

आणि विनायकानें तो खेळच चालू केला.

वासुदेवराव मनांतून खूप चिडले.

अखेर विनायकरावानें भावाच्या अंगावरून हात नेऊन त्या पोराला चिडवायला सुरवात केली. विनायकरावाला मनांतून वाटत होतें कीं यांत आपण आपल्या भावाला आनंदच देत आहोंत म्हणून.

पण—

—झोंपमोड झालेल्या वासुदेवाला तें सहन झालें नाहीं. त्यानें चटकन् तोंड फिरवून भावाला चापटी मारण्याकरितां हात उचलला.

—विनायकाच्या तें लक्षांत आलें; तो चटकन् मागें व्हायला गेला—

—आणि चापटी कुठेंतरी बसायची ती नेमकी विनायकरावांच्या गालावर काडकन् वाजली.

—त्या चापटीनें विनायकरावांच्या अंगांतील शक्ति जागी झाली. ते तांबरलेल्या डोळ्यांनीं भावासमोर उभे राहिले.

वासुदेवालाही आपली चूक झालीसें किंचित् वाटलें आणि ते उठून बसले.

विनायकरावांचा संताप अनावर झाला होता. त्यांना वासुदेवाचें काय करावें आणि काय नाहीं तें कळेना. अखेर शेवटीं त्यांनीं वासुदेवाला दोन्ही हातांनीं अलगत वर उचललें.

"विन्या–विन्या–गाढवा–" वासुदेवराव वरून ओरडूं लागले.

ती आरडाओरड ऐकून खालचीं माणसें वर धावून आलीं. त्यांत त्यांची आईही होतीच.

—आईचा कानोसा लागतांच विनायकराव शुद्धीवर आले. त्यांनीं आपल्या भावाला अलगद खालीं उभें केलें. इतक्यांत आई वर आलीच होती. तिच्याकडे पाहण्याचें चुकवून विनायकराव भावाच्या पायाशीं बसले व कांगावखोरपणानें म्हणाले, "हं मार–मार मला किती मारायचं आहे तें! घेऊन टाक एकदां माझा जीव म्हणजे मला पोटाला घालायला आणि अभ्यासाला म्हणून तुझा खर्च होतो आहे तो तरी वांचेल! हं–मार!"

आणि हें ऐकून वासुदेवराव हंसायला लागले. आईला काय होतें आहे तेंच कळेना. वासुदेवराव म्हणाले, "विन्या, खरंच तुझ्याकरितां मी श्रम करतों आणि खर्च करतों तें फुकट गेल्यासारखं वाटतं मला! गाढवा, ताकद कशाकरितां कमवायची? रग कशाकरितां वाढवायची? वस्ताद कशाकरितां व्हायचं? आपल्यावर कदाचित् अन्याय झाला तर त्याचं परिमार्जन करतां यावं म्हणून ना? मीं रागानं तुझ्या तोंडांत मारली– वास्तविक तसा हेतु

नव्हता माझा– यांत तुला अन्याय वाटला ना ? त्या भरांत तूं मला उचललंस ना ? मग कां शरमलास ? तुझ्यावर मीं केलेल्या अन्यायाचं दे मला प्रायश्चित ! वस्ताद– अरे असा रडतोस कां ?"

विनायकराव उठून आपल्या भावाकडे पहात राहिले.

"विन्या, या वेळेला मी तुला गय करतों– पण पुन्हा अन्यायाविरुद्ध चिडून हात उचललेला असतांना– थोरला भाऊ वगैरे नात्याच्या मोठेपणामुळें शरमलास– तर घरांतून घालवून देईन तुला ! मग असली शक्ति सांठवून करायची आहे काय ?"

—विनायकरावांच्या डोळयांतून पाणी यायला लागलें. त्यांना आईकडेही पाहवेना. त्यांना आपल्या भावाबद्दल अपूर्वाईचा अभिमान वाटला– त्यांनीं आपले दोन्ही खांदे रगीनें उडविले आणि जणूं आपण तालमींतच आहोंत या कल्पनेनें त्यांनीं नित्याच्या सवयीप्रमाणें मारुतीच्या पायाला हात लावून जसा नमस्कार करतात त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या भावाच्या पायाला हात लावला–तोच आपल्या कपाळाला लावला आणि जिन्यांत उभ्या असलेल्या माणसांना बाजूला करीत— विनायकराव तिकडे वळतांच तीं बाजूला झालीं होतींच म्हणा— खालीं आले.

— आणि पांच दहा मिनिटांत विनायकरावांच्या तालीम करायच्या खोलींतून उठाबशा काढण्याचा आवाज घुमूं लागला !

---

## चळवळी कशा चालतात? : : ५

एका हमरस्त्यावर एक किराणा मालाचें दुकान होतें. दुकान अत्यंत टापटिपीचें होतें. दरवर्षी तिथलें फर्निचर पॉलीश केलें जाई. कांहीं नवें फर्निचर येई. तें दुकान व्यावहारिक दृष्ट्या प्रगतीपथावर होतें. दुकानाचें वैभव वाढत होतें. मालकाचें वैभव वाढत होतें. पण त्या दुकानांत जीं तीन माणसें नोकरीला होतीं तीं पहिल्यापासून कायम होतीं. आणि त्यांच्यांत मात्र कांहीं फरक झालेला नव्हता.

ते दुकानांत नोकरीला आले त्या वेळीं त्यांचे चेहेरे जसे सुकलेले होते तसेच आजही होते. सुकण्यांत सुद्धां कमीजास्तपणा कांहीं नव्हता. त्यांची नेमकी मिळकत हेंच त्याचें कारण होतें. त्यांचे पगार कधीं वाढवले गेले नाहींत. कारण गांवांत काय बेकारी आहे हें मालकाला माहीत होतें तसें त्या नोकरांनाही माहीत होतें. त्यांच्यापेक्षां कमी पगारांत माणसें मिळत असतांना सुद्धां त्याच पगारावर आपण पहिलीं माणसें कायम ठेविलीं आहेत या रुबाबांत

मालक होते आणि केविलवाणेपणानें कां होईना पण 'आपण जगूं शकतों' या खुशींत ते नोकर होते.

कांहीं कांहीं उंदीर सुद्धां जसे धिटाईनें आपल्या घरीं वावरत असतात तशी त्या नोकरांची स्थिति होती. दुकानांत आलेल्या गिऱ्हाइकांकडे पहाणारे त्यांचे ते केविलवाणे डोळे पाहून मला नेहमीं अशा उंदरांची आठवण होई.

दुकानांत आलेलीं गिऱ्हाइकें फावल्या वेळीं विनोद करीत. तो ऐकून किंवा पहून सुद्धां त्यांना मोकळ्या मनानें हसणें शक्य नव्हतें. शरीरांत गेलेल्या अन्नाचें पचन कसें होतें हें जसें आपल्याला दिसत नाहीं तसें राग, लोभ, हास्य हे विकार त्यांच्या देहांत आंतल्याआंत पचले जात. त्यांच्या चेहेऱ्यावर त्यामुळें खुशी नाखुशी कधींच दिसत नसे. यंत्राच्या हालचालीप्रमाणें रेखीव पण मरगळलेली त्यांची हालचाल दिसे.

एखाद्या वेळेला खारीक किंवा बदाम जोखतांना एखादा सहज खालीं पडे. तो तसाच पायदळीं तुडविला जाई आणि नंतर केव्हां तरी संधि साधून तो त्यांच्या तोंडांत जाई. त्यामुळें जरी ते बदाम किंवा खारीक खात तरी त्या वस्तूंचा आकार बदामासारखा किंवा खारकेसारखा असे येवढेंच. पण तो त्यांच्या तोंडांत जातांच त्याला कसलीच चव रहात नसे.

पण त्या तीन माणसांपैकीं एक माणूस माझ्या जास्त लक्षांत राहिला होता. त्याचें नांव रघुनाथ. त्याच्या इंग्रजी कांहींतरी चार यत्ता झाल्या होत्या. तिथें त्याचें शिक्षण सुटलें. नंतर पांच सहा वर्षें त्यानें मिळेल तिथें नोकरी करण्यांत काढलीं. आणि गेल्या तीन वर्षांपासून तो वर सांगितलेल्या किराणा मालाच्या दुकानांत येऊन

दाखल झाला होता. बाहेरच्या जगांत स्वतःच्या कर्तबगारीची आणि आशेची निराशा अनुभवल्यानंतरच प्राणान्तिक उपासाला निष्ठेनें बसावें तसा तो त्या दुकानांत आला होता. त्याची ती लांब मुदतीची आत्महत्या होती! आत्महत्येकरितां आगगाडीच्या रुळावर आडवें पडावें तसा परिस्थितीच्या रुळावर तो आडवा पडला होता. परिस्थितीची गाडी त्याच्या अंगावरून जेव्हां संपूर्ण जाईल तेव्हां त्याची आत्महत्या होणार होती!

आणि आज तीन वर्षें त्या दुकानांत अशा तऱ्हेनें घालविल्यानंतर त्याच्या मनांत स्वतःच्या परिस्थितीबद्दल जो असंतोष होता तो पूर्णपणें नाहींसा झाला होता. तो मनांतून पूर्ण समाधानी होता. कारण त्याला त्याखेरीज दुसरा कांहीं इलाजच नव्हता.

अशा संपूर्ण निराशामय परिस्थितींत सुद्धां वरकरणी सक्तीनें आनंदी होण्याचे त्याला दोन दिवस येत : एक दसऱ्याचा दिवस आणि दुसरा दिवाळींतील लक्ष्मीपूजनाचा दिवस. त्या वेळीं तो मारे जरीचा रुमाल व कोरे कपडे घालून दुकानांत वावरे. पण दसऱ्याच्या दिवशीं तो असा दुकानांत सजून येई आणि त्याच दिवशीं टांग्याचे घोडे असेच सजलेले फुलांमाळांनीं शृंगारलेले वाजत गाजत त्याच्या दुकानावरून जात! त्या वेळीं आणि त्याच दिवसापुरतें त्याचें गेलेलें असमाधान पुन्हा जागृत होई! आणि पायांत चांदीचे तोडे घातलेला घोडयाचा पाय ज्या डौलानें घोडे रस्त्यांत टाकीत तशी आपण या सजलेल्या वेषांत कोणती लकब वापरतों आहों हें शोधून काढण्यांत त्याचें डोकें गर्क होई!

दुसऱ्या दिवशीं घोडे पुन्हा नेहेमींसारखे वावरूं लागत. हाही तसाच वावरूं लागे. दसऱ्याच्या दिवशीं घोडयांच्या अंगावर घात-

लेल्या माळा पडून जाईपर्यंत त्यांच्या अंगावर दिसत तसेंच यांचेंही होई. दुकानांत दसऱ्याला अत्तर वांटीत आणि तें वांटून संपल्या-नंतर तो अत्तरदाणींत राहिलेल्या कापसाचा बोळा ह्या पळवी, आपल्या हातावर खूप चोळी आणि नंतर कानांत घालून ठेवी. तो कितीतरी दिवस तसाच टिके !

—आणि मग पुन्हा त्याचें नेहमींचें आयुष्य चालू होई !

—छटाक जिरें, पावशेर हिंग, अदपाव बदाम, खडीसाखर, रवा तूप—वगैरे.

त्या दुकानांत मराठी वर्तमानपत्रें सगळीं येत. त्यानें मनांत आणलें तर तीं त्याला सगळीं वाचायला मिळालीं असतीं पण तीं वाचण्याची तो कधींच फिकीर करीत नसे; पण त्या वर्तमानपत्रांतील सिनेमाच्या वगैरे आकर्षक जाहिराती तो सगळया मन लावून वाची.

"चिमी असें म्हणाली, नंतर टकी काय म्हणाली तें प्रत्यक्ष पडद्यावर पहा !" अशा मनोवृत्तीशीं लगट करणाऱ्या जाहिराती त्याला खूप आवडत. कारण त्यालाही घरीं चिमी होती.

—पण

त्याचें घर फक्त अडीच खणांचें होतें. वर लांकडें सांठवायला पोटमाळा होता. अडीच खणांतच पाव खणांत नळ मोरी होतीं. एक स्केअर फूट जागा एका कोपऱ्यांत रॉकेलच्या डब्यानें अड-विली होती ! दोन स्केअर फूट जागा चुलीनें अडविली होती. जास्त वर्णन कशाला करूं ? त्याची बहुतेक सर्व जागा त्याच्या सामानानें अडविली होती. त्याची करामत येवढीच कीं तिथें तो स्वतः राहूं शकत होता.

या एवढयाशा जागेंत नुसता तोच रहात नसे तर त्याची चिमी.

त्याला एक दोन मुलेंही होतीं तीं सुद्धां रहात असत ! आजुबाजूला अशींच बिऱ्हाडें व त्यांचा असाच कलकलाट होता. त्यांनीं आपलें दार लावून घेतलें तरी त्यांच्या रहात्या खोलीला शेजारच्या दुसऱ्या बिऱ्हाडाला जोडणारें जें दार होतें तें लावलेलें असलें तरी त्यांतून शेजारच्या बिऱ्हाडांतून उजेड आंत मोकळया मनानें येऊं शके आणि दुसरी जी भिंत होती तिला तर शेजारच्या बिऱ्हाडांतून उजेड यावा म्हणून मालकानें खिडकीच ठेविली होती. आणि बिऱ्हाडकरूनें कधीं हा उजेड बंद करून स्वतःच्या आरोग्याला धोका आणूं नये म्हणून त्या खिडकीलामालकानें दारच ठेवलें नव्हतें !

अशा परिस्थितींत तो असल्यामुळें आपल्या मनोवासनेला जाहीर उद्गार किंवा मोकळें प्रदर्शन करणें त्याला त्याच्या बायकोजवळसुद्धां शक्य नव्हतें ! त्यामुळें त्याला मनोवृत्तीशीं लगट करणाऱ्या अशा जाहिराती आणि सिनेमा फार आवडत ! आणि अलिकडे तर त्याची एक फार छान सोय झाली होती. एक सिनेमा थिएटरचें जाहिराती लिहिण्याचें काम त्याला मिळालें होतें. आणि त्यांत त्याला स्वतःला जें समाजांत बोलतां येत नव्हतें– घरीं वागतां येत नव्हतें– तें तो मोकळया मनानें लिही. तें एक त्याचें व्यसनच होतें. तें सिनेमाचें थिएटर भरभराटींत होतें. मालकाजवळ चिकार पैसा झाला होता. त्यामुळें त्याचा आत्मविश्वास फार वाढला होता ! आणि त्या आत्मविश्वासाच्या जोरावर तो माणसें कुत्र्यासारखीं वागवी ! तो मालक रघुनाथाची जाहिराती लिहिण्याची फक्त स्तुति करी आणि त्याला आत्मविश्वासानें जाहिराती लिहिण्याबद्दल एक छदामही देत नसे; फक्त सिनेमाच्या फुकट पासावर त्याला राबवी !

रघुनाथाची अशा तऱ्हेनें मनोरंजनाची व्यवस्था झाली होती.

पण......पण......

—अशा रघुनाथाला गांवांतल्या चळवळीला वर्गणी देतांना जेव्हां मीं पाहिला तेव्हां माझा माझ्या डोळ्यांवरच विश्वास बसेना! कारण याची वर्गणी आणा, दोन आणे, चार आणे याच्यावर नसे. त्या वर्गणीला प्रसिद्धि मिळणार नव्हती. चळवळींत त्याला भाग घ्यायला सवड नव्हती. त्या चळवळीशीं याला कांहीं कर्तव्य नव्हतें—

मग—?

एक दिवस त्याचें तें किराणा मालाचें दुकान रात्रीं त्यानें बंद केलें. मालकाजवळ चाव्या दिल्या. मालक निघून गेला. हा रेंगाळत चालला होता. मी सहज कांहीं तरी कामाकरितां बाहेर पडलों होतों. रघुनाथ माझ्या दृष्टीच्या टापूंत होता.

आज रघुनाथाचा पगार झालेला होता.

इतक्यांत रघुनाथला एकानें हटकलें,

"काय रघुनाथ, किती दिवस थापा मारणार आतां? होतोस ना कॉंग्रेसचा सभासद?"

"पाहूं पुढच्या महिन्याला—"

"पण मग मला त्याचा काय उपयोग? या महिन्यांत आमचं इलेक्शन आहे—तेव्हां आतां सभासद झालास तर तुझ्या मताचा आम्हांला उपयोग होईल—"

किलकिल्या डोळ्यांनीं कुठें तरी पहात रघुनाथनें खिशांतले पैसे काढले व तो कॉंग्रेसचा सभासद झाला. तो मनुष्य पावती फाडूं लागला.

रघुनाथ म्हणाला, "कांहीं गरज नाहीं—"

तो मनुष्य निघून गेला. आणि रघुनाथनें आपल्या कपाळावर

आलेला घाम पुसला. तोंच समोरून एक मिरवणूक आली. हैदराबाद सत्याग्रहाला मदत मिळविण्याकरितां ती मिरवणूक निघाली होती. लोकांकडून पै-पैसा गोळा करण्याकरितां थाळींतून पैसा जमा करणें चाललें होतें. रघुनाथनें त्या थाळींतही कांहीं पैसे टाकले. आणि तो आपल्या घराच्या दिशेनें झपाझप चालूं लागला.

पण मीं त्याला हटकलें. त्याच्या दुकानचा मी गिऱ्हाइक होतों. रघुनाथ अदबीनें थांबला.

आणि मीं सलगीनें त्याच्या पाठीवर हात टाकला.

पण रघुनाथला तें बरें वाटलें नाहीं. तो झट्कन् बाजूला झाला. आणि साशंक मुद्रेनें माझ्याकडे पाहूं लागला.

मीं मोकळ्या मनानें त्याला हांक मारली, "रघुनाथ–"

"काय ? मला घरीं लौकर जायला पाहिजे. कांहीं काम आहे माझ्याकडे ?"

"आज फारसा उदार झाला आहेस ?" मी हें म्हणत आहें तोंच आमच्या शेजारीं एक भिक्षेकरी बाई येऊन उभी राहिली. तिच्या कडेवर एक लहान मूल होतें आणि ती आपल्या नेहमींच्या अत्यंत केविलवाणेपणानें आमच्याजवळ पैसा मागूं लागली.

मीं रघुनाथाकडे पाहिलें. मला वाटलें आज याला पैसे उधळायची निशा आली आहे तेव्हां तो चटकन त्या बाईच्याही अंगावर पै-पैसा टाकील. पण त्यानें परत माझ्याकडे पाहिलें आणि गालांतल्या गालांत हसत माझ्याकडे पहात म्हटलें, "आपण देणार आहांत कांहीं ? का सांगूं त्या बाईला जायला ?"

मीं कांहीं न बोलतांच त्या भिकारणीला पैसा दिला. ती माझ्या औदार्याचा जयजयकार करीत निघून गेली.

मीं रघुनाथला विचारलें, "काय रे रघुनाथ तू कां नाहीं दिलास त्या बाईला पैसा ?"

रघुनाथ लाजून खालीं पहात म्हणाला, "भिकाऱ्यानं भिकाऱ्याला पैसा देण्यांत काय मौज आहे ?"

"अन् मग त्या वर्गण्या दिल्यास त्या ?" मीं माझें कुतूहल बोलून दाखविलें.

"साहेब—" तो खालीं मान घालूनच म्हणाला, "आमच्या चार पसुरड्यांनीं त्या चळवळींचं काय बरं वाईट व्हायचं आहे ?" रघुनाथाचे डोळे पाण्यानें भरून आले व तो पुढें म्हणाला, "पण केवळ मी आपल्या मनाच्या समाधानाकरितां दिले ते पैसे ! आपण जाणतांच माझं आयुष्य कसं जखडून गेलं आहे तें— देशाकरितां, धर्माकरितां कांहीं करावं तर आमच्या आयुष्यांत आम्हाला कुठं सवड आहे ! जीव जगविण्याची सर्कस करण्यांत आमचं आयुष्य वितळतं आहे ! पण देशाकरितां—धर्माकरितां आम्हालाही कांहींतरी करावंसं वाटतं— ती तळमळ आम्हालाही आहे— हें आम्हीं कुठं आणि कसं बोलून दाखविणार ?"

मी कांहींतरी भावनेच्या भरांत मोठ्यानें कुजबुजलों, "देश— आणि धर्म—"

"होय साहेब, काय आमच्या तोंडीं हे शब्द कसेसेच वाटतात तुम्हाला ? आमचा नाहीं कांहीं देशाशीं आणि धर्माशीं संबंध ?" रघुनाथनें कांहींशा चिडीनें विचारलें.

रघुनाथच्या या प्रश्नाचें उत्तर देण्याचें मला भानच राहिलें नाहीं. मी फक्त त्याच्याकडे कुतूहलानें पहात होतों. इतक्यांत रघु-नाथच पुन्हा बोलूं लागला, "साहेब, शारीरिक वासनेकरितां जशी

माणसाला बायको लागते तशी मनाच्या समाधानाकरितां—कांहीं उदात्त अनुभविण्याकरितां त्याला देशधर्माकरितां थोडीशी झीजही सोसावीशी वाटते—नव्हे असं जर झालं नाहीं तर माणसांचं समाधान तिथंही खुरटतं !"

"बरं पण रघुनाथ—तुझीं मतं तरी काय आहेत ?" मीं मध्येंच विचारलें.

"कांहीं नाहींत साहेब—आमची रहायची जागा येवढी थोडी आहे कीं तिथं कसेबसे अंग चोरून दाटीदाटीनं आम्ही रहातों—तिथं आणखी मतांची अडगळ कुठं संभाळणार ?"

"आतां तूं कांग्रेसलाही पैसे दिलेस आणि हिंदुमहासभेच्या हैदराबाद सत्याग्रहालाही पैसे दिलेस—"

"होय साहेब !"

"पण तुला हें माहीत आहे का, कीं कॉंग्रेस आणि हिंदुमहासभा एकमेकांच्या विरुद्ध आहेत ?"

"नाहीं साहेब—"

"मग मी तुला सांगतों कीं ते एकमेकांच्या विरुद्ध आहेत !"

"असतील—!" रघुनाथ बेगुमानपणानें म्हणाला.

"मग आतां वेळ आली तर कुणाला पैसे देशील तूं ?" मीं विचारलें.

"सवड झाली तर दोघांनाही देईन ! त्यांचीं मतं असतील एक-मेकांच्या विरुद्ध—मला काय करायचं आहे त्याच्याशीं ?"

"तुला त्याच्याशीं कांहींच कर्तव्य नाहीं !"

"नाहीं ! दोन्ही चळवळीच ना ? दोघांचाही अंतिम हेतु देशाचं चांगलं करावं—व्हावं हाच आहे ना ? खरं सांगूं साहेब तुम्हांला—

स्वतःचं पोट भरण्याच्या चळवळीपेक्षां जो कांहीं निराळं करीत असेल तिथं आदरानं आमची मान लवते ! वेळीं पोटाला चिमटा घेऊन सुद्धां तिथं पैसा द्यावासा वाटतो ! अहो साहेब, असं पहा तुम्ही— आपल्या गल्लींत पेटलेल्या होळीलाही आपण पैसा टाकून नमस्कार करतों आणि अगदीं शहराच्या दुसऱ्या टोकालाही होळी पेटलेली दिसली तरीही आपण आदरानं तिथं पैसा टाकून नमस्कार करणार नाहीं का ?''

—किती साधेंभोळें तत्त्वज्ञान ?

गरीब रघुनाथाचा पै-पैसा असा जातो— श्रीमंत रघुनाथही अशाच जाणीवेनें हजारों रुपये चळवळींत ओततात !

—आणि चळवळ हाच ज्यांचा पोटापाण्याचा प्रश्न आहे— असे लोक— ! ! !



## पैसे कसे संपणार ? : : : ६

त्या माणसाकडे पाहून मीं अशी कल्पना केली कीं याच्याइतका सुखी मनुष्य क्वचितंच पाहायला सांपडेल. त्या माणसाचें वय जवळ जवळ सत्तरीच्या घरांत होतें. पण त्याचा तो बालकासारखा निष्पाप चेहरा पाहून मला कमालीचें समाधान वाटलें. डोक्याला पगडी, अंगावर रेशीमकाठी उपरणें, अंगांत सिल्कचा कोट, नेसतें तलम धोतर, पायांत पुणेरी जोडा, आणि हसतमुख चेहरा !

"काय भाडं आहे हो या जागेचं ?" त्यानें मला हसत हसतच विचारलें.

"सगळी घेणार का जागा ?"

"हो. तेवढी लागेलच आम्हांला !"

"साठ रुपये भाडं पडेल !" एका कुंडींतील फुलझाडावर कीड दिसली ती टिचकीनें झाडून टाकीत मीं सांगितलें.

"कांहीं जास्त नाहीं भाडं जागेच्या मानानें." त्यानें आपल्या खिशांतील चेकबूक काढलें, साठ रुपयांचा चेक लिहिला आणि

तो माझ्या हातावर ठेवीत म्हणाला, "येत्या पहिल्या तारखेपासून येतों आम्ही रहायला !" त्यानें हंसत हंसत मला नमस्कार केला आणि अंगावरचें जरीचें उपरणें सावरीत तो फाटकाबाहेर पडला.

फाटकाबाहेर पडल्यानंतर पुन्हा मागें वळून फाटक लावून घ्यायला तो विसरला नाहीं. चेकवरचें अक्षर न्याहाळीत मीं हसत म्हटलें, "राहूं द्या; मी लावतों फाटक !"

तो गृहस्थ दृष्टीआड झाला आणि चेकवरील अक्षरांकडे मी पुनः पाहूं लागलों. किती सुंदर आणि वळणदार होतें तें अक्षर ! त्या अक्षरांकडे पाहून त्या लिहित्या माणसाचा हसरा चेहराच जणूं माझ्या डोळ्यांसमोर दिसूं लागला !

त्याच्या घरीं किती माणसें आहेत वगैरे मीं कांहींच चौकशी केली नाहीं. अशाकरितां कीं त्या माणसाबद्दलची आपली उत्कंठा कायम रहावी ! आणि इतक्या हसतमुख माणसाची गृहस्थिति—

—एक चांगलें बिऱ्हाड सहजासहजीं मिळाल्याबद्दल मी आनंदित झालों होतों !

—पहिल्या तारखेच्या सुमारास त्याचें सामान आमच्या घरीं येऊं लागलें. किंमतवान सामान होतें सर्व. उत्कृष्ट कारागिरीचे नमुने. मला वाटलें, असें सामान बाळगण्याची ज्या माणसाची ऐपत आहे त्यानें आपलें सत्तेचें घर कां बांधू नये !

—पहिली तारीख उजाडली. तोंपर्यंत त्याचें सर्व सामान आलें होतें आणि जागेंत लावूनही झालें होतें. पहिल्या तारखेला तो सकाळीं हसत हसत आला. उपरण्याआड त्यानें कांहींतरी आणिलें होतें. मीं माडीवरून कुतूहलानें पहात होतों.

मी खालीं आलों.

उपरण्याचा पदर त्यानें दूर केला. त्याच्या नांवाचा फलक होता तो. एकदां त्यानें तो आपल्या उपरण्याच्या पदरानें पुसलासा केला आणि भिंतीवर खिळा होताच त्याच्यावर अडकविला.

पाटीवर 'आहेत' अशीं अक्षरें होतीं तीं त्यानें माझ्याकडे पहात 'नाहींत' अशीं केलीं आणि माझ्याकडे हसत हसत पहात तो आंत गेला आणि त्यानें दार लावून घेतलें.

त्याच्या बिऱ्हाडांत सामान पुष्कळ आलें होतें पण माणसें फक्त दोनच आलीं. तो आणि त्याची बायको. आणि एक फक्त घरकामाचा गडी होता. तो गडी आहे हें आम्हांला कळायला सहा सात दिवस लागले. कारण त्याच्या गळयांत पांचपदरी सोन्याचा गोफ होता. केसांचा सुंदर भांग पाडलेला, हातांत आंगठ्या, नेसतें तलम धोतर. त्यांचा देहही इतक्या सुस्तींत वाढलेला दिसत होता कीं तो जरी अक्षरशत्रु होता तरी दिसायला सुशिक्षित दिसे! एक दिवस मी सहज खालीं आलेला असतांना त्यांनीं त्याला "ए श्रीपत" म्हणून हाक मारली, आणि त्यानें चटकन त्यांच्यापुढें तस्त केलें. तेव्हां आम्हांला कळलें कीं हा गडी आहे म्हणून !

मग मींच एक दिवस श्रीपतला विचारलें, "काय, गळयांतला गोफ किती तोळयांचा ?"

श्रीपत लाजला आणि हसला, "मालकांची मेहरबानी आहे ही —गेल्या दिवाळीला त्यांनीं आपल्या हातांनीं माझ्या गळ्यांत घातला !"

"पगार किती आहे रे तुला ?" मीं विचारलें.

"चाळीस रुपये !"

हें ऐकून मला दमच लागला !

"फार दिवस आहें मी यांच्याकडे- जवळ जवळ वीस बावीस वर्षं- रावसाहेब मामलेदार होते तेव्हांपासून." त्या गड्याचें वय आज तीस वर्षांचें दिसत होतें.

इतक्यांत श्रीपतला त्याच्या मालकांनीं हाक मारली आणि तो निघून गेला. त्या माणसाचें वय होतें सत्तराच्या सुमारास आणि त्याच्या बायकोचें वय दिसत होतें साठीच्या सुमाराचें. दिसण्यांत मात्र दोघेंही एकसारखीं होतीं. दिसण्यांत सारखींच उजळ, चेहऱ्यानें सदा हसरीं. आणि त्यांच्याकडे पाहून एक निराळाच विचार सुचे. देवाच्या दगडी सुबक मूर्ति असाव्यात ना— त्या कितीही वर्षांच्या जुन्या झाल्या तरी कांहीं त्या मूर्तींना बाक येत नाहीं उलट रोजच्या घासण्यापुसण्यानें नवीन नवीनच उजळा त्या मूर्तींना यावा, तसें त्यांच्या देहांचे बाबतींत दिसत होतें. त्या दोघांपैकीं कोणीही वाकलेलें नव्हतें- सुकलेलें नव्हतें- झिजलेलें नव्हतें ! अशीं माणसें क्वचितच पाहायला सांपडतात, नाहीं ?

त्या दांपत्याच्या बोलण्यांतही एक प्रकारचा और रुबाब होता. कोणत्याही विषयावर बोलतांना त्यांची स्वतःची भूमिका अत्यंत उच्च असे. सामाजिक विषयावर बोलतांनाही सहानुभूतिपर व पितृ-वात्सल्याची भूमिका ! जणूं सगळें ह्यात जग यांच्या मुलांलेकरांचें -नातवंडापतवंडांचें आहे ! आणि त्यांच्या हसण्यांत एक उत्कृष्ट लकब होती.

त्यांच्याशीं आपण बोलायला म्हणून यावें आणि तें त्यांचें हसणें पाहून आपण गप्पच बसावें, आपणही थोडेंसें हंसावें आणि निघून जावें, असें निदान माझें तरी होत असे !

आणि एक दिवस ते आपणहूनच माझ्याशीं बोलले.

मी माझ्या छोट्या वसन्ताला खेळवीत दाराशीं उभा होतों--तोंच तो गृहस्थ बाहेरून आला---आणि कां कुणाला ठाऊक, थोडासा माझ्याजवळच थबकला. नेहमींसारखें गालांतल्या गालांत न हसतां मोकळ्या मनानें हसला आणि म्हणाला,

"भाऊसाहेब, तुम्हांला एक विचारूं का ?"

मीं हसण्यानेंच त्याला 'होय' म्हणून सांगितलें.

"या तुमच्या वसन्ताला आम्ही आमच्याकडे खेळायला नेत जाऊं का ?"

"वा ! आनंदानं !"

त्या म्हाताऱ्यानें माझ्या वसन्ताचें बोट धरलें आणि माझा वसन्ताही मला सोडून त्या म्हाताऱ्याबरोबर आनंदानें निघून गेला.

त्या म्हाताऱ्याची आणि त्या गड्याची कुरबूर नेहमीं चाले. आणि ती मात्र जगाविरुद्ध होती. गड्यानें कोणताही जिन्नस आणावा आणि म्हाताऱ्यानें कुरकुरावें, "यापेक्षां महाग जिन्नस कुठं मिळण्यासारखी नव्हती का ?"

मीं एक दिवस त्या गड्याला विचारलें, "काय रे, ू लग्न वगैरे केलं नाहींस वाटतं अजून ?"

एका भारी सिगारेटचा झुरका मारीत त्यानें उत्तर दिलें, "ती अट आहे ना या नोकरींत !" त्यानें डोळे मिस्किलपणानें मिचकावले आणि म्हटलें, "नाद करायला रावसाहेबांची हरकत नाहीं—पण लग्न नाहीं करतां कामा !"

इतक्यांत त्याच्या मालकांची हाक त्याला ऐकूं आली आणि तो घाईघाईनें निघून गेला.

—आणि एक दिवस त्या म्हाताऱ्याच्या चेहऱ्यावरचें हास्य

मला मालवलेलें दिसलें. डोळयांच्या कोपऱ्यांत पुसट पुसट अश्रूही होते. त्यांनीं मला हाक मारून थांबविलें.

वेळ संध्याकाळीं साडेसात आठची होती !

बाहेर अंधार पडला होता. आजूबाजू मलूल दिसत होत्या !

"भाऊसाहेब, तुमच्या एक लक्षांत आलं आहे का ?"

"काय ?" मीं सहजच विचारलें.

"आज दोन तीन दिवस तुमच्या वसन्ताला आम्हीं खेळायला नाहीं नेला आमच्याकडे ! तुमच्या लक्षांत आलंच असेल !"

वास्तविक माझ्या लक्षांत कांहींच आलें नव्हतें. पण मीं त्यांच्या समाधानाकरितां 'होय' म्हटलें.

"कां ?" त्यांनीं कुतूहलानें प्रश्न केला.

"तें मात्र माझ्या नाहीं लक्षांत आलं !"

"या ना आमच्याकडे. सांगतों तुम्हांला !"

मला ती पर्वणी वाटली. मी त्यांच्या मागोमाग त्यांच्या घरांत गेलों. एका खुर्चीवर मोकळ्या मनानें बसलों. त्या म्हाताऱ्याची आज कांहींतरी कारणानें मला बरीच चलबिचल झालेली दिसली.

कुठून तरी बोलायला सुरवात करावी म्हणून मीं सहज विचारलें, "आपलीं मुलं वगैरे कुठं असतात ?"

"माझीं मुलं—माझीं मुलं ??" तो अक्षरशः रडत रडत हसूं लागला. आणि भुवया एकसारख्या उडवीत, म्हणाला, "म्हणून तर आम्हीं तुमच्या वसन्ताला खेळायला आणायचं टाकलं आज दोन चार दिवस !"

त्या म्हाताऱ्याची बायकोही एखाद्या पुतळ्यासारखी तिथें येऊन उभी राहिली आणि पागोळ्यांतून पावसाचें पाणी गळावें तसें तिच्या

डोळ्यांतून पाणी निथळत होतें !

"काय ग, किती मुलं झालीं आपल्याला ?" म्हाताऱ्यानें मोठ्या ऐटीनें आपल्या बायकोला विचारलें.

"चार मुलगे आणि तीन मुली !" त्या बाईनें शान्तपणानें उत्तर दिलं.

"पण बरं का भाऊसाहेब, गंमत ही कीं एकाही आमच्या मुलानें आपल्या भावंडाचा चेहरा पाहिला नाहीं ! एखाद्या विसरभोळ्या माणसाची या पावसाळ्याची छत्री जशी दुसऱ्या पावसाळ्याला टिकं नये— हरवायचीच त्याची कुठं तरी— तसं आमचं झालं बघा !"

त्या दांपत्याच्या त्या वेळच्या हावभावांवरून आणि हसण्या-रडण्यावरून माझ्या लक्षांत आलें कीं सुख आणि दुःख एका परा-कोटीला गेल्यानंतर दोहोंचीही किंमत एकसारखीच आहे !

"आणि मला वाटतं," म्हातारा आठवणीनें आणखी कांहीं सांगूं लागला, "आमचं शेवटचं बाळ गेलं आणि त्याच वर्षी हा गडी आमच्याकडे राहिला. आणि तो जरी गडी म्हणून आमच्याकडे असला तरी त्याचीच चैन आणि शोक आम्ही चालवतों आमच्या मुलासारखी ! म्हणजे काय ? वाईट असलं तरी गंमत आहे !"

पाण्यावर स्वस्थ पडून रहावें आणि आपल्या अंगावरून एक एक लाट वहात जावी त्याप्रमाणें मी तो प्रसंग अनुभवीत होतों !

"मधें आम्हीं एक मुलगी संभाळली होती नातेवाईकांतलीच— तिचं लग्नही आम्हीं मोठ्या थाटानं केलं—आणि शेवटीं व्हायचं तेंच झालं !"

"काय ?" मीं चमकून विचारलें.

"आमची तीही छत्री हरवली !"

या वेळीं कसला अभिनय करावा आणि काय बोलावें या

संमोहांत मी पडलों होतों !

"ही झाली माणसांची गोष्ट," तो पुढें बोलूं लागला, "मीं एक कुत्रा पाळला होता. मला वाटलं तो तरी माझ्यामागं टिकेल आणि मला निरोप द्यायला येईल शेवटीं– पण छट् ! तिथंही आमच्या आयुष्यांत अतिशयोक्तीचा अलंकार भेटायला आला आम्हांला– ! तो कुत्रा पहिल्या बिन्हाडांत गेला– आणि आम्ही या घरीं रहायला आलों !"

विषय बदलण्याच्या हेतूनें मीं म्हटलें, "पण मग तुम्हीं आपल्या गड्याचं लग्न वगैरे कां करून देत नाहीं ?"

"तुमच्याही कानांवर ती बातमी आली का ? मी असा त्याच्या लग्नाच्या आड कां येतों आहें हें त्याला नाहीं कळायचं– अहो त्यांत एक तत्त्वज्ञान आहे !"

"तत्त्वज्ञान ?" मीं आश्चर्यानें विचारलें.

"होय तत्त्वज्ञान ! आम्हीं आमच्या आयुष्याचं सार काढलं. त्याच्यांत आम्हांला असं दिसून आलं कीं पैसा– पैसा कारण आहे याच्या मुळाशीं ! आमचा पैसा चांगला नाहीं— मी मामलेदार होतों– खूप पैसा मिळवला— लोकांचा पैसा तोडून आम्हीं एकत्र केला– माणसं आमच्यापासून पळालीं ! नाहीं– खरं आहे हें ! या पैशानं कुणाचा वंश वाढायचा नाहीं अशी आपली आमची समज झाली आहे ! आणि म्हणूनच आम्ही गड्याला— सांगतों लग्न करूं नकोस. आमच्या पैशावर जगतो आहेस—वंश वाढायचा नाहीं तुझा— फक्त दुःख पदरांत पडेल ! जगांत दुःखाचं मूळ काय ? वाजवीपेक्षां पैसा जास्त जवळ करणं— नंतर कुणाला तरी तो कमी पडतो ! त्याला कमी पैशाचं दुःख— याला जास्त

पैशाचं दुःख !"

आतां ज्ञानेश्वरी ऐकायला बसल्यासारखें मला वाटूं लागलें.

"आतां मला एकच साधायचं आहे— खूप पैसा उधळतों मी हल्लीं. माझा पैसा आणि आयुष्य माझेबरोबर संपायला पाहिजे !"

"मग एखाद्या संस्थेला कां देऊन टाकीत नाहीं आपण ?"

"अहो, माझा वंश वाढायचा नाहीं आहे ना ? वंश तरी कशा-करितां ? नांव टिकविण्याकरतांच ना ? अहो, संस्थेला माझ्या पैशाचं नांव आलं कीं संस्था खलास झाली म्हणून समजा ! आणि खरं म्हणजे माझं नांव मलाच टिकायला नको आहे ! एक दिवस हा रावसाहेब गेला कीं त्याच्या मागं कुणीं रडायला नको— हसायला नको— कुणाचा नफा नाहीं तोटा नाहीं– फक्त जागा रिकामी होईल हाच जगाचा फायदा !"

'कुणीं रडायला नको कुणीं हसायला नको' असें तो सहज म्हणत असतांना मीं सहज उभी असलेल्या त्याच्या पत्नीकडे पाहिलें.

तीही सवाष्ण खिन्न हसली !

"मी भरल्या ओटीनंच जाणार आहें ! अगदीं निश्चित ! तें माझ्या हातांत आहे; इथंच शेवटपर्यंत तुमच्याकडे— राहिलों तर तेवढा सोहाळा तुम्हांला करावा लागेल."

मला श्वास लागला !

"आतां तुमच्या लक्षांत आलं असेल कीं तुमच्या वसंताला आम्हीं गेले दोन चार दिवस खेळायला कां नाहीं आणला तो— अहो, आमचीं पोरं वांचलीं नाहींत– दुसऱ्याचीं नको का त्यांना लाभायला ? अहो, आज किती तरी वर्षांत आम्हीं लहान मुलांना हात

लावला नाहीं आणि जवळ घेतलीं नाहींत म्हणा ना ! किती तरी वर्षं ! पण परवां कसं मन चळलं कुणाला ठाऊक— आतां नाहीं आम्ही तुमच्या वसन्ताला कधीं आणणार आणि हात लावणार ! खरंच नाहीं !”

जणूं कांहीं बोलायला आणि ऐकायला येत नसल्याप्रमाणें माझी स्थिति झाली—आणि मी तिथून उठून माझ्या घरीं आलों !

## पुरुषाचें भाग्य : : : ७

कुटुंबांतील सर्व मंडळी एका ठिकाणीं जमली होती आणि त्यांच्या तडाख्यांत एक ज्योतिषी सांपडला होता. त्या ज्योतिष्यानें आपला धंदा बहुतेक नुकताच सुरू केलेला असावा. कारण 'आपली पत्रिका अगदींच साधारण आहे– विशेषशी चांगली नाहीं' इत्यादि वाक्यें तो बेधडक बोलत होता. त्यामुळें त्या ज्योतिष्याविषयीं कोणाचेंच फारसें चांगलें मत झालें नाहीं.

त्या कुटुंबांत अगदींच कुरूप असा एक मुलगा होता. हत्तीच्या दांतांइतक्याच वैशिष्ट्यानें ज्याचे दांत बाहेर आले आहेत, मनुष्यानें अत्यवस्थ स्थितींत जसे डोळे फिरवावेत त्याप्रमाणें ज्याच्या डोळ्यांची नेहमींच ठेवण आहे, घराचें दुपाखी छप्पर असावें त्याप्रमाणें लांब सडक नाक, ऐसपैस भुवया, चेहऱ्याला जेमतेम एक बोट रुंदीचें कपाळ, दांतांची वस्ती ओठांच्या बाहेर आल्यामुळें तोंड सदैव उघडें– त्या जाणिवेनें नेहमीं हसरा राहणारा चेहरा, हाता-पायांच्या काड्या पण त्यांच्यावर पोटाचा नगारा– तो संभाळतांना

पायांच्या उडणाऱ्या तिरपिटीमुळें त्याच्या चालण्याला येणारी एक प्रकारची बेढब लचक वगैरे वर्णनाचा तो मुलगा होता. तो त्या ज्योतिष्याकडे आशाळभूत केविलवाण्या नजरेनें पहात होता.

सगळे लोक आपआपलें भविष्य पहात होते. त्यांत आपलेंही भविष्य पाहिलें जावें असें त्यालाही वाटत होतें. पण तें कोणीच मनावर घेत नव्हतें. व आपल्याकडे त्यांचें लक्ष जावें म्हणून तो कुरूप मुलगा आपल्या शरीराच्या निरनिराळ्या आकृत्या करून उभा राहून त्यांचें लक्ष आपल्याकडे वेधण्याचा प्रयत्न करीत होता.

पण त्याचें भविष्य त्याच्या रंगारूपानेंच लिहिलें आहे तेव्हां आणखी पहाण्याचें कारण काय असें इतर मंडळीस वाटत होतें व त्या कुरूप मुलाचें म्हणणें कोणी मनावर घेत नव्हतें!

पण त्या नवख्या ज्योतिष्यानें जेव्हां इतर सर्वांच्याच पत्रिका साधारण आहेत असें बेधडक सांगितलें तेव्हां त्या ज्योतिष्याची टिंगल करण्याकरितां एकानें म्हटलें, "मग आमच्या या महाराजांची पहा बरं पत्रिका—"

हें बोलणें अर्थात् त्या कुरूप मुलाला उद्देशून होतें.

तें ऐकून त्याला अनिवार आनंद झाला व तो किती प्रसन्नपणानें त्या ज्योतिष्यासमोर येऊन बसला!

त्याची पत्रिका त्या ज्योतिष्यानें पुढें घेतली.

पांच मिनिटें तो ती पत्रिका न्याहाळीत होता. तेवढ्या वेळांत अनंत मनोराज्यें त्या कुरूप मुलाच्या डोळ्यांपुढून सरकत होतीं व तीं मनोराज्यें आपल्याला प्राप्त होणार आहेत असेंच बहुधा हा ज्योतिषी आपल्याला सांगणार असें वाटून तो कुरूप मुलगा जवळ जवळ जिभल्या चाटायच्या रंगाला आला होता.

इतक्यांत ज्योतिषीमहाराज म्हणाले,

"आपला विश्वास बसणार नाहीं पण आपणां सर्वांपेक्षां ही कुंडली ज्यास्त भाग्यवान् आहे. ही कुंडली पुढे अचानक नशीब काढणार आहे. आज कुणाला सांगूनही खरं वाटणार नाहीं– अचानक लाभ– अचानक प्रसिद्धि— सर्व कांहीं अचानक आहे या कंडलीच्या बाबतींत !"

"आंऽ, खऽरंच ?" त्या कुरूप मुलानें विचारलें आणि दोन बोटें एकावर एक वाजवीत तो अक्षरशः नाचायला लागला.

त्या गोष्टीला आज वीस वर्षें होऊन गेलीं होतीं ! साधारण कुंडली असणारे त्या कुरूप मुलाचे सर्व नातेवाईक सुखांत होते. याचें मात्र शिक्षण नाहीं, कांहीं नाहीं. त्याच्या वयाला सुद्धां पस्तीसावें वर्ष होतें. पण अर्थात् वय वाढलें म्हणून का त्याचें लग्न होणार होतें ?

पण लग्नाची कल्पना त्याला आली नसेल का ? त्यामुळें तो बायकांच्या बाबतींत भयंकर लाजरा झाला होता. कोणत्याही बाई-कडे तो मोकळ्या मनानें पाहूं शकत नव्हता. दुधाच्या पातेल्याशीं मांजर जात आहे तोंच त्या मांजराच्या पाठींत कुणींतरी पेकाट मोडकळीला येसतर काठी घालावी आणि त्या प्रसंगानें त्या मांजरानें दुधाच्या पातेल्याची कायमची दहशत घ्यावी त्याप्रमाणें त्याचें झालं होतें. सर्वांचीं लग्नें झालीं, आतां आपल्याही लग्नाचें कोणी तरी बोलेल असें त्याला वाटत होतें. पण बरेच दिवसपर्यंत त्यानें वाट पाहूनही तसें कोणीच न बोलल्यामुळें त्यानें एक दिवस धीर करून आपल्या वडील भावाला विचारलें सुद्धां,

"माझं केव्हां लग्न करणार ?"

वडील भावानें कमालीच्या उपहासात्मक शब्दांत सांगितलें, “तुझ्यासारख्या वेड्या टोणप्याचं लग्न करून काय करायचं आहे!”

हें ऐकून त्याच्या पेकाटांत काठी बसल्यासारखेंच झालें. त्यानें एकदम कांहींतरी आवेगांत सदऱ्याच्या बाहीसकट आपला हात चावला आणि—

—तो जगत होता !

भाकड जनावराला केवळ कसाईखाना दाखवायचा नाहीं म्हणून कांहीं पालक पोसत असतात त्याप्रमाणेंच त्याचे संबंधी त्याला पोशीत होते. पण तो फक्त प्रत्यक्ष पैसे मिळवून आणीत नव्हता येवढेंच. तरी पण तो घरांत इतका राबविला जात होता कीं त्याचा इतरांना मोबदला द्यायचा म्हटलें असतें तर पांच पंचवीस रुपये सहज द्यावे लागले असते.

घरांतलीं उष्टीं खरकटीं, धुणें पाणी, घर झाडणें, अंथरुणें घालणें वगैरे सर्व कामें तोच करी.

वस्तुतः तो बुद्धीनें बावळट नव्हता– फक्त शरीरानेंच होता. पण सर्वांनीं त्याला ‘बावळट’ म्हणून म्हणून बावळट बनविला होता. व तो आपल्या लहान वयांत ‘बावळट’ या पांघरुणाखालीं शिरून काम चुकवितां येत होतें म्हणून जास्तच बावळटपणा मुद्दाम करूं लागला. पण हें त्याचे वडील होते तोंपर्यंतच चाललें. पुढें त्याला घरांत राबावेंही लागलें आणि बावळटही ठरावें लागलें.

—आणि आतां एक दिवस त्याच्या मनानें घेतलें कीं घरांत आपण इतक्या जवळचे नातेवाईक असून असें राबूनही शिवाय ‘या टोणग्याला पोसावें लागतें!’ असे अपमानास्पद शब्द ऐकून घेऊन जगत बसण्यापेक्षां घराबाहेर पडून– हेंच काम कोठेंही करावें

—चोख मोबदला ठरवावा– आणि अभिमानानें जगावें असें त्याला वाटलें आणि तो धीर धरून कुणालाही न सांगतां घराबाहेर पडला. त्याच्या मनानें धीर धरला होता पण शरीर घाबरलें होतें. तो बावळटपणानें रस्त्यांतून चालला होता.

इतक्यांत पाठीमागून एक मोटर येत होती. तिचा आवाजही यानें ऐकला. हें आपणावर केवढें मोठें संकट चालून येत आहे या कल्पनेनें तो जो गांगरला आणि त्या भरांत एका पायावर उभा राहून दोन्ही हात डोक्यावर उभारून असा कांहीं चमत्कारिक बावळटपणानें उभा राहिला—

—तो विचार करीत होता आपल्या अंगावर येणारी मोटर चुकविण्याकरितां आपण या बाजूला जावें का त्या बाजूला जावें. आणि हा विचार करीत तो रस्त्याच्या मध्यभागीं उभा राहिला.

तें विचित्र ध्यान असें मधेंच उभें राहिलेलें पाहून त्या मोटर ड्रायव्हरनें चिडून मोटर थांबविली. पण मोटरमध्यें मालक पाठी-मागें बसलेले असल्यामुळें ड्रायव्हरला मोटरीला अडथळा आणणाऱ्या माणसाला शिव्या देणें अशक्य झालें म्हणून शिव्या तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत तो शिव्या देण्याच्या आवेशानें मोटारीचा हॉर्न एकसारखा वाजवूं लागला.

मोटरीसमोर उभें राहिलेलें तें विचित्र ध्यान पाहून आंत बसलेले मालकही चिडले व ड्रायव्हर जरी मालकांना पाहून शिव्या द्यायला दबकला होता तरी ड्रायव्हरला न जुमानतां मालकानें शिवी हासडली,

"ए बदमाष × ×—"

"कोण बदमाष ? माझं नांव आहे ...... काय बरं ?" तो वेडीवाकडी उडी मारून मोटरीसमोरून बाजूला होत बडबडला.

कां कुणाला ठाऊक. मोटरीचे मालक त्याच्याकडे पाहून आतां खूष झाले होते. ते खालीं उतरले आणि थोडेंसें गोडींत बोलून कांहीं दबकावून त्यांनीं त्या बावळटाला मोटरींत बसविलें आणि मोटर चालू झाली !

* * *

तो टोणपा घरांतून गेल्याचें कळलें पण कोणींच त्याची चौकशी केली नाहीं. वाईटपणा पदरीं न येतां ही ब्याद निघून गेली म्हणून प्रत्येकाला हायसें वाटलें.

—आज त्या गोष्टीला दोन वर्षें होऊन गेलीं होतीं. घरचीं माणसेंही त्याला विसरलीं होतीं !

आज त्याच्या घरचीं सर्व माणसें एकदम एका सिनेमाला गेलीं होतीं. एका दुय्यम प्रतीच्या कंपनीचा तो एक भिकार बोलपट होता. कथानकांत कथानक नव्हतें, विनोद नव्हता; पण त्यांत एक –विचित्र माणूस काम करीत होता आणि त्याच्या सहज येण्या-जाण्यानें– वाटेल तसें बोलण्यानें कथानकांत नसतांनासुद्धां भरपूर विनोद निर्माण होत होता. प्रेक्षकांची हसून हसून मुरकुंडी वळत होती. तो विचित्र माणूस म्हणजे त्यांच्या घरचा पळून गेलेला टोणपाच होता.

"अरे, हा बावळट इथं कसा ?" त्याच्या घरचीं माणसें कांहीं तरी आवेशानें ओरडलीं व एकीकडे त्यांनीं टाळ्या वाजवल्या. बाकीच्या प्रेक्षकांना येवढीच चिथावणी पुरे होती. सर्व प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवायला सुरवात केली !

—आणि त्या पडणाऱ्या टाळ्यांपासून त्या सिनेमा कंपनींत त्या बावळटाचें महत्त्व भलतें वाढलें ! त्याचें काम असल्याशिवाय

कंपनीचा पुढें एकही चित्रपट निघेना.

—कथालेखकांना त्या कंपनीची पहिली अट असे कीं, "गोष्ट अशी लिहा कीं त्यांत आमचा बावळट स्टार याला प्रामुख्याची भूमिका पाहिजे !"

दारीं येणाऱ्या बऱ्या कथालेखकांना घालवून देण्याकरितां त्या बावळटाचें बुजगावणें कंपनीला चांगलेंच उपयोगी पडूं लागलें.

पुढें पुढें तो बावळट कथालेखकांना कथा कशा लिहाव्या हेंही सांगूं लागला. मालकही त्याला हरकत घेत नसत.

त्या बावळटाला मात्र अशा तऱ्हेनें अचानक प्रसिद्धि आणि द्रव्यलाभ ज्योतिष्याच्या सांगण्याप्रमाणें मिळाला होता आणि तो आणखी किती प्रमाणांत वाढेल याचीही खात्री नव्हती. कारण—

—त्यानें एक दिवस आपल्या मालकाला गंभीरपणानें सांगितलें, "अलीकडच्या लेखकांत कांहींच दम नाहीं ! तेव्हां त्यांच्या नादीं लागण्यापेक्षां आपण जुनीं सीरियस नाटकें कॉमिक करून दाखवूं. म्हणजे असं, आपण राणा भीमदेव या नाटकाचा चित्रपट घेऊं आणि त्यांत राणा भीमदेवाचें काम मी करीन–काय मालक, कशी आहे कल्पना? हॉ हॉ हॉ !"

—अर्थात् मालकांनाही ती कल्पना पसंत पडली !

आणि त्या बावळटाच्या घरचीं, त्याला 'टोणपा' म्हणून हिणविणारीं माणसें हल्लीं त्या बावळटाकडून पास घेऊनच गांवांतल्या कोणत्याही सिनेमाला जाऊं येऊं लागलीं !

त्या बावळटाची एकदां एका वर्तमानपत्रानें मुलाखत घेतली. त्यांत छापून न आलेला भाग फार महत्त्वाचा होता. त्या शरीरानें बावळट पण वृत्तीनें गंभीर बनलेल्या टोणप्यानें खालील वाक्यें

सांगितलीं होतीं !

"सदसद्विवेकबुद्धि हा बावळटपणा आहे, मतं हा मूर्खपणा आहे. जगांत बाजारभाव कशाला आहे हें पाहून जो लांगूलचालन करील तोच समाजाचें नेतृत्व करूं शकेल! सिनेमा नटनटींचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे! लौकरच समाजाचें आणि देशाचें नेतृत्व या लोकांकडेच— आमच्याकडेच— येणार आहे. त्याला आमचा इलाज नाहीं! परवांचीच एक गंमत सांगतों. राष्ट्रसभापति राजेंद्रबाबू आले होते एका ठिकाणीं. सभा महत्त्वाची होती आणि गंभीरपणें चालली होती— आणि मीही तिथें सद्भावनेनं हजर झालों. अर्थात् थोड्या उशीरां! पण लगेच राजेंद्रबाबूंकडे डोळेझांक करून तरुण पिढी माझा ऑटोग्राफ घेण्याकरितां सभा चालू असतांनाच धावली. काय टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला त्या वेळीं! मग बोला आपल्या देशाचे भावी पुढारी कोण ते? आम्ही काय करणार त्याला? लोक आम्हांला मोठे समजतात पण आमची किंमत काय आम्हांला समजत नाहीं? खरं कीं नाहीं? बोला— **वन्दे मातरम्.**"

---

# जात ! : : : ८

एका खेडेगांवांतील ही गोष्ट आहे. खूप खूप गरीब लोक रहात होते तिथें. गांवांत मातीच्या विटांचींच घरें पुष्कळ. बहुतेक एक-मजलीच. पुष्कळ घरांवर रॉकेलच्या डब्याचेच पत्रे सरळ करून घातलेले होते. क्वचित् एखाद्या घरावर नळीचीं कौलें दिसत. आणि शहराची आठवण करून देणारें फक्त एकच घर होतें त्या खेडे-गांवांत. आणि तें सदा बंदच असे ! कुणींतरी हौसेनें 'आपलें गांव' म्हणून तिथें तें घर बांधून ठेविलें होतें. आणि वर्षातून फार तर आठ पंधरा दिवस त्याचा मालक तिथें रहायला येई. बाकी सर्व दिवस त्या घराला कुलूपच असे !

त्या गांवांत एक मारवाडी रहात असे. त्याला दलुचंद मारवाडी म्हणत. तो स्वभावाचा अत्यंत धीमा होता. कोणी म्हणत त्याच्या-जवळ आठ दहा लाखांची इस्टेट आहे. आणि त्यानें रुपयांचीं पोतीं भरून तळघरांत सांठविलीं आहेत आणि कुणाला संशय येऊं नये म्हणून त्यानें वर कोळशांचीं पोतीं रचून ठेवलीं आहेत.

पण तो मारवाडी दिसण्यांत कमालीचा दरिद्री दिसे— अंगावरचा कपडा त्याचा कधीं धड नसायचा. त्याचें वय होतें सत्तरीच्या घरांत. पण त्याचा गांवांत वचक दांडगा असे. जवळ जवळ सर्व गांव त्याच्या सावकारी जाळ्यांत सांपडलेलें होतें. रस्त्यानें जातांना तो प्रत्येकाला अजीजीनें नमस्कार करी. मग तो त्याचें ऋण बुडविलेला रिणको असो कीं गांवचा पाटील असो. मारवाड्याच्या नमस्कारांतील अजीजी सारखीच असे.

देण्याघेण्याबद्दल त्याला कोर्टांत फार थोडा वेळ जावें लागे. हातींपायीं पडूनच तो आपलें घेणें वसूल करी! धाकदपटशा आणि कोर्टकचेरी यांपेक्षां त्याचें हातींपायीं पडणें फारच भयंकर असे!

अलीकडे तो आपला धंदा साफ बसला असे सांगत असे. आणि तें खरेंही होतें. कारण त्या खेड्यांत आतां कांहीं राहिलेंच नव्हतें!

पण त्याचा धंदा गांवाच्या डोळ्यांवर कधीं आला नाहीं. कारण गांवांतले लोक एक दरिद्री तर हा सात दरिद्र्यासारखा राही. त्याच्या स्वतःच्या घरींसुद्धां तो दर आठवड्याला मोजून शिधा देत असे. त्यामुळें दलुचंद मारवाड्याच्या घरीं कोणी गेल्यास त्या मारवाड्याची बायकोच त्याच्याजवळ कुरकुरायची! तो मारवाडी बाहेर सावकारी करीत असे आणि त्याच्या बायकोला महिन्यांतून एखाद्या आठवड्याला तरी शेजारींपाजारीं एखाद्या जिनसेची उधारी करावी लागे. कारण आठवड्याच्या शिध्यांतून ती जिन्नस संपलेली असे! आणि मग उसनवार आणलेली जिन्नस ती दुसऱ्या आठवड्यांत काटकसर करून फेडी!

दलुचंद मारवाड्याला मुलेंबाळेंही बरींच होतीं. त्याच्या घरीं लग्नकार्येंही झालीं होतीं. पण एकाही लग्नांत त्याची श्रीमंती कधीं

दिसली नाही. लग्नांत जी थोडी उधळमाधळ होई ती फक्त अन्न-खर्चांत ! आजूबाजूच्या खेड्यांतील महार, मांग, रामोशांसुद्धां जेवायला यायचीं. दिवसरात्र जेवणावळ चालायची. आणि फक्त त्याच वेळेला मात्र दलुचंद सर्वांना अगदीं हसतमुखानें आग्रह करीत पंक्तींत फिरायचा– सगळ्यांच्या मुलाबाळांची चौकशी करायचा– कुणी आजारी असल्यामुळें आलेला नसला तर त्याच्याकरितां केलेलीं पक्वान्नें बांधून घरीं न्यायला द्यायचा !

त्याला कुठें आपल्या नांवच्या धर्मशाळा बांधण्याचाही नाद नव्हता. त्याचा नेहमींचा मोठा दानधर्म म्हणजे त्याच्या दारच्या ओट्यावर एक मोठा थोरला पाण्याचा रांजण भरलेला असायचा आणि आल्या गेल्याला तिथें पाणी नेहमीं मिळायचें. महार, मांग इत्यादि जातिनिर्बंधसुद्धां त्या वेळीं पाळला जात नसे.

भुकेलेलेल्या अन्न, तान्हेलेल्याला पाणी हें मात्र कोणताही देखावा न करतां तो अखंड देत असे. औषधपाण्यावर त्याचा भरवसा नव्हता. कुणीं औषध पाण्याला मदत मागितली तर त्याच्याकडून कधींही मिळायची नाहीं ! "अरे, औषधपाणी कसलं करतोस ? देताचं तीर्थ पाज त्याला !" असा त्याचा नेहमींचा मंत्र असे.

त्याचीं मुलेंबाळें कधीं चिडून बापाशीं भांडत. तीं म्हणत, "दलजीबाबा, आम्हांलाही पोटभर खाऊं घालीत नाहींस, तूंही खात नाहींस. तूं कधीं धड कपडं ल्येत नाहींस, आमच्या कपाळींच्याही चिंध्या कधीं सुटत नाहींत. तेव्हां हे पैसे शेवटीं कुणाच्या मढ्यावर घालणार आहेस ?"

या म्हणण्याचाही दलजीबाबाला कधीं राग आला नाहीं. तो शान्तपणानें म्हणे, "अरे आहेत कुठं पैसे ? आणि असले तरी

कुणाच्या बापाचे ते पैसे ? अन् माझ्याजवळ पैसे आहेत – पैसे आहेत– असं कां गांवभर कोकलतोस? बेटा, अशा हुलीनं एखादा दरवडा यायचा ना आपल्या घरावर !"

"बरं झालं येईल तर ! म्हणजे पैसा कुठं पुरून ठेवला असलास तर ती अडगळ तरी जाईल आपल्या घरांतून आणि खरंच नसला तर लोकांचा संशय तरी फिटेल !"

त्या खेड्यांत एक रामदासी येऊन राहिला होता. तो रामदासी सपत्नीक होता. तो त्या खेड्यांत भिक्षा मागून रहात असे. त्या रामदाशाकडे या दलजी मारवाड्याचें येणेंजाणें फार असे. रोज रात्रीं तो नित्यनियमानें रामायण ऐकण्याकरितां तिथें यायचा. तें रामायण सांगण्याबद्दल रोज एक भिक्षेची मूठ आणि दुसरी मूठ केवळ भिक्षा म्हणून, अशा दोन मुठी भिक्षा दलजीशेटकडून त्या रामदाशाला मिळे.

तो रामदासीही सत्त्वस्थ होता. गांवांत भिक्षा मागून तो आपलें पोट भरी. पण दर दासनवमीला सज्जनगडीं जायला थोडेंसें आणि इतर केव्हां क्षुल्लक अडीअडचणीला त्याला कर्ज काढावें लागे. अर्थात् दलजी मारवाडी त्याला फारशी कुरकुर न करितां ते देतही असे. पण प्रत्येक नवीन पैसे दिले कीं तो त्या रामदाशाकडून प्रॉमिसरी नोट लिहून घेई. त्या रामदाशाला व्याज मात्र दरमहा दरशेकडा फक्त दीड रुपयाप्रमाणें असे.

असें बरींच वर्षें चाललें होतें. करतां करतां रामदाशाची प्रॉमिसरी नोट दीडशे रुपयांवर गेली होती. आणि अलीकडे मात्र दलजीशेटच्या त्या रामदाशापाठीमागें पैशांबद्दल विनवण्या चालू झाल्या होत्या. त्या पैशांकरितां दलजीशेट आपल्या घरगुती अडचणी त्याला सांगूं लागे.

तो रामदासी मनांतून अत्यंत खिन्न झाला होता. त्याला वाटत होतें, दलजीशेटजींनीं आपल्याकडून जरी प्रॉमिसरी नोट घेतली असली तरी ती नांवापुरती असावी. आपणांकडून पैसे मिळतील ही त्यांना अपेक्षाही नसावी !

दलजीशेटच्या रोजरोजच्या विनवणीनें रामदासी मनांतून खंगू लागला. त्या रामदाशाच्या बायकोलाही त्या खेड्यांत रहाणें असह्य वाटूं लागलें. अखेर एक दिवस ती आपल्या नवऱ्याला म्हणाली-सुद्धां कीं, "आपण हें खेडं सोडून जाऊं या. चार ठिकाणीं हिंडून त्या शेटजींचे एकदां पैसे फेडून टाकूं या. पण त्याचे पैसे फिटा-यच्या आंत तो आपल्याला हें खेडं सोडून जाऊं देईल का ?"

रामदासीही खिन्नपणानें हसला आणि म्हणाला, "मला वाटलं, शेटजींना मी रोज तास दीड तास रामायण वाचून दाखवितों. शेटजी मला त्रास देणार नाहींत ! रामायण ऐकण्याकरितां एक मूठ भिक्षा जास्त हा कांहीं मोबदला नव्हे !"

आणि एक दिवस त्या रामदाशाला वाटलें, शेटजींच्या या अजीजीनें पैसे मागण्याच्या पद्धतीपेक्षां एखाद्या पठाणाचा जुलूम परवडला ! त्या रामदाशानें शेटजींच्या पैशांची हाय घेतली.

आणि चार पांच दिवसांतच त्यानें इहलोकास रामराम ठोकला.

ही बातमी दलजीशेटच्याही कानीं गेली. ते कावरेबावरे झाले. त्यांनीं त्या रामदाशाकडून लिहून घेतलेली प्रॉमिसरी नोट शोधून खिशांत टाकली आणि तडक ते त्या रामदाशाच्या घराकडे वळले.

मागें दलजीशेटनीं असाच एक फार्स केला होता. त्यांचा एक रिणको मेला होता. त्याच्याकडे येणें असलेल्या पैशांची त्यांच्याकडे प्रॉमिसरी होतीच. ती घेऊन तो दलजीशेट त्या रिणकोच्या प्रेताजवळ

रडत विव्हळत बसला ! त्या रिणकोची बायको जितक्या वेदनेनं रडत ओरडत नव्हती, त्याच्या दसपट आवेशानें शेटजी रडूं ओरडूं लागले.

"अरे, कसा रे असा अचानक गेलास ? माझ्या नोटीचे पैसे आतां कोण देईल ? माझीं पोरंबाळं आतां भुकेनं तडफडतील कीं रे !! त्यांना खायला काय घालूं ?" वगैरे वगैरे. शेटजी कांगाव्यानें रडूं लागले. ते प्रेताजवळून हालेनात. अखेर त्या रिणकोच्या कांहीं नातेवाईकांनीं, कांहीं आल्यागेल्यांनीं, जेव्हां शेटजींच्या पैशांची भरती केली तेव्हां शेटजींनीं आपलें रडणें आवरतें घेतलें आणि डोळे पुसले व ते म्हणूं लागले, "फार छान माणूस होता. असा मनुष्य देण्यांत मरावा, लई वाईट ! देणेकऱ्याला मरणोत्तर पुढं चांगली गति मिळत नाहीं. मला तें सहन होणार नाहीं. मरणोत्तर सगळ्यांना चांगलीच गति मिळाली पाहिजे. जा बाबा, आतां त्याला घेऊन ! मी कशाला आतां अडवूं ? पण जरा त्याची शेवटीं क्रिया वगैरे नीट करा हं ! आपलं रहावत नाहीं म्हणून सांगतों. मृताचं नेहमीं चांगलं करावं !"

तो रामदासी गेल्याची बातमी गांवांत पसरली होती.

आणि तो रामदासी दलजीशेटचें कांहीं देणें आहे हेंही गांवांतल्या लोकांना माहीत होतें. त्या रामदाशाच्या घराशीं लोक जमूं लागले.

—पण त्या रामदाशाच्या दाराशीं दलजीशेटजींना बसलेले पाहून तिथें जाण्याचा कुणालाच धीर होईना ! शेटजींच्या पोराबाळांची उपासमार टाळण्यासाठीं गांवांतले लोक वर्गणी करून त्या रामदाशानें घेतलेलें कर्ज द्यायला कोणीच तयार नव्हतें. आणि

रामदाशाला ऋणमुक्त करून त्याला चांगली गति मिळावी ही तर आतां शेटजींची सदिच्छा रहाणारच !

––लोक रामदाशाच्या घराकडे येईनातच !

––आंत रामदाशाची पत्नी रडत होती.

––बाहेर दलजीशेट खिन्न मुद्रेनें हेलपाटे घालीत होते.

––रामदासी पहाटे पांचला गेला होता. आणि आतां दुपारचे बारा वाजण्याचा समय झाला होता.

गांवांत सगळीकडे बातमी फुटली होती, 'रामदाशाच्या दारीं शेटजी बसून आहे. तेव्हां तिकडे जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तो शेटजी कंटाळून तिथून निघून गेला म्हणजे मग पाहूं या कांहीं तरी' असें गांवकऱ्यांनीं ठरविलें होतें.

खेडेगांवांतल्या पद्धतीप्रमाणें गांवांत प्रेत ठेवून जेवणें गांवकरी निषिद्ध समजतात. सर्व लोक दलजीशेट तिथून जाण्याची वाट पहात घरीं ताटकळत बसले होते. थोड्या वेळानें कुणाच्या तरी घरचें लहान पोर दलजीशेट तिथून निघून गेलें किंवा नाहीं तें पाहून जाई.

दलजीशेटही आतां तिथें बसून कंटाळले होते. गांवांतले लोक आजच एवढे निष्ठुर कसे झाले याचा त्यांना अंदाज येईना.

त्या खेडेगांवांत मला लोक जरा शिष्ट समजत आणि कांहीं कांहीं बाबतींत मला मानही देत. मला गांवांतल्या ह्या घडामोडींची आतांपर्यंत बातमीच नव्हती.

कुणी तरी चार लोक अखेर जमा झाले आणि माझ्याकडे आले. त्यांनीं सांगितलेली ती हकीकत ऐकतांच माझेंही डोकें भडकलें. माझा राग अनावर झाला आणि मी तसाच तावातावानें त्या रामदाशाच्य घराकडे जाऊं लागलों.

—रामदासाची बायको इतका वेळ रडून रडून आतां कंटाळली होती.

—आणि दलजीशेट तिथें उभे राहून कंटाळले होते.

—मला तिथें येतांना पहातांच दलशेटजींनीं एक सुटकेचा श्वास टाकला आणि गहिंवरलेल्या आवाजांत त्यांनीं मला हांक मारली,

"दादा !"

शेटजींच्या त्या भयंकर केविलवाण्या आवाजाची मला पूर्ण ओळख होती !

मींही शेटजींना चिडून हांक मारली,

"दलजीशेट !"

"दादा —" शेटजी पुन्हा केविलवाण्या स्वरांत म्हणाले, "अहो, गांवांनीं आज काय कट केलाय् होय ? आपले रामदासीबुवा गेले. किती साधे, किती प्रेमळ, आणि रामायण तरी काय रसाळपणानं सांगत! गरीब होता बिचारा! गांवांत सगळ्यांशीं चांगला! पण काय माणसाची जात आहे पहा– शेवटच्या घडीला कुणी हजर नाहीं !" शेटजींनीं आपले डोळे पुशीत म्हटलें.

"पण तुम्ही हजर असल्यावर कोण हजर रहाणार इथं ?" मी रागानेंच म्हणालों.

"अहो, मी सुद्धां कुठं मागं घ्यायला तयार आहें ? पण त्यांच्या जातीचीं माणसं गांवांत असतांना —"

"पण तुमची जात आड येते आहे ना त्यांच्या जातीचीं माणसं त्यांच्याजवळ यायला ? तुम्ही इथनं चालायला लागा म्हणजे माणसं जमा होतील !"

"मी गेल्यावर माणसं जमा होतील ! कां ? मी काय करतोंय्

त्यांना ? मी तर लोकांची वाट पहातों आहें!" शेटजी गयावया करीत म्हणाले.

"पण वर्गणी करून रामदासी देणं लागत असलेले तुमचे पैसे द्यायला लोकांच्या अंगांत त्राणनाहीं ना आतां शेटजी! एवढ्या पैशांचं शेवटीं काय करणार आहांत ?"

शेटजी माझ्याकडे कावरेबावरेपणानें पाहूं लागले. परिस्थितींतला त्यांना कांहीं तरी संदर्भ समजला. ते एखाद्या अजागळासारखे आपल्या अंगावरच्या कोटाचे खिसे चाचपूं लागले. पांच दहा मिनिटांनीं त्यांनां काय हवें होतें तें सांपडलें वाटतें. एक कागदाचा फाटका चिठोरा हातांत घेऊन थरथर कांपत्या हातांनीं मला दाखवीत शेटजी म्हणाले, "दादा, होय. रामदासीबुवा माझं देणं लागत होता. शेदीडशे रुपये. मीं प्रॉमिसरीही लिहून घेतली होती त्याच्याकडनं. ही पहा फाडून आणिली आहे मीं घरून येतांनाच! तुमचा काय समज झाला, मी त्या पैशांकरितां इथं धरणं धरून बसलों आहें ? नाहीं– नाहीं– नाहीं दादा! ही प्रॉमिसरी तर मीं फाडून आणली आहेच. दादा, पण त्या मेल्या माणसाचं क्रियाकर्मान्तर चांगलं व्हावं म्हणून पैसेही आणले आहेत मीं!"

म्हाताऱ्यानें कांपऱ्या हातानेंच आपल्या कमरेचा कसा सोडला आणि त्यांतून सुर्ती रुपये काढून माझ्यापुढें वाजवीत म्हणाला, "हे पैसे त्याचेच आहेत समजा! अहो, रोज तास दीड तास त्याच्या-कडून मी प्रभु रामचंद्राचं रामायण वाचून घेत होतों अन् देत होतों. काय त्याला ? एक मूठभर धान्य! तेव्हां ही त्याचीच कमाई आहे, पण फक्त ती मीं आपल्याजवळ ठेवली होती असं समजा—! हरे राम! हरे राम!! असा गैरसमज झाला होता होय गांवकऱ्यांचा ? दादा,

नाहीं नाहीं बरं तसं ! हांक मारा ना गांवकऱ्यांना ! तुम्ही सांगा त्यांना समजावून. पण मी जरा इथंच बसणार आहें ! गेल्या प्राण्याचं शेवटचं दर्शन तरी घेऊं द्या मला !"

असें म्हणत शेटजी रस्त्यांत जाऊन बसले आणि त्यांनीं आपल्या कपाळावर चमत्कारिक तऱ्हेनें हात मारून घेतले.

मीं जाऊन गांवकऱ्यांना हांक मारून आणले. सर्व गांवकरी शेटजींना शिव्या देतदेतच जमा झाले. मीं त्यांना सांगितलें, "शेटजी आज अडवणुकीकरितां आले नव्हतेच मुळीं !"

माझ्या सांगण्यावर कुणाचाच विश्वास बसेना.

शेवटीं धीर धरून शेटजीच त्या रामदाशाच्या घरांत गेले आणि त्यांनींच त्या रामदाशाच्या बायकोची समजूत केली, "रडूं नको बाय ! आतां झालेलं काय पुनः येणार आहे ? मी भाऊ आहें बघ तुझा. माझ्याकडे पहा. मी चतकोर भाकर खात असलों तर नितकोर तरी घालीन तुला ! तुलाही वाचायला येतंच. मला चालेल तूं रामायण वाचून दाखवलंस तरी !" शेटजी आज नाटकी रडत नव्हते.

अखेर रामदासी लोकांच्या खांद्यावर बाहेर आला तसे दलजी-शेटही बाहेर आले.

—रामदासी चौघांच्या खांद्यावर निजधामाच्या मार्गानें चालूं लागला.

—मीही त्या यात्रेच्या मागोमाग चाललोंच होतों.

मी दहाबारा पावलें चाललों असेन नसेन तोंच माझ्या खांद्यावर कोणीं तरी मागून येऊन हात ठेवल्यासारखें मला वाटलें. मीं चमकून मागें पाहिलं.

शेटजींनींच माझ्या खांद्यावर हात ठेवला होता.

शेटजी चालतांना एकसारखे अडखळत होते आणि त्यांतल्या त्यांत ते उंच होऊन शांत झालेल्या रामदाश्याकडे पहाण्याचा प्रयत्न करीत होते.

आणि असें चालतां चालतां शेटजी गहिंवरलेल्या आवाजानें मला म्हणाले,

"दादा, मी पैशाकरितां येऊन बसलों होतों असं तुम्हांलाही वाटलं? दादा, तसं नव्हतं हो! मी पैशांचा फार तगादा करतों असं वाटतं तुम्हांला? पण माझा सगळ्या उमरीचा अनुभव सांगूं तुम्हांला? माणसाला सवड दिली कीं संवई होतात! मग ख्यालीखुशाली सुचते! अहो, मीं गांव लुबाडलं असं गांव बोलतं पण मी तरी कुठं चैन करतों आहें? गांव जसा दरिद्री रहातो तसाच मीही रहातों! माणसाचं असं आहे बघा. त्याला दहा रुपये द्या, तेही पुरत नाहींत; शंभर द्या, तेही पुरेनासे होतात; हजार द्या, तरीही अपुरेच! अन् पांचच रुपये हाताशीं आले तरी जगतोच कीं माणूस! जशी सवड असेल त्याप्रमाणें माणसाचा स्वभाव बनतो. अन् दादा, तुम्हांला खरंच वाटलं मी पैशाकरितां दाराशीं बसलों होतों? हो ऽऽ! तुम्हीही म्हणत असाल, हं बसला असेल दलजीशेट; जातीचा मारवाडी आहे ना तो! पण दादा, सवड आहे तोंपर्यंत जात गोत—पण अडचणीच्या वेळेला, शेवटच्या क्षणाला—अखेर सगळ्यांची जात माणसाचीच ना दादा? मारवाडीही असेच जायचे, ब्राह्मणही असेच जायचे, मराठे-ही असेच जायचे अन् महारमांगही असेच जायचे!" समोरच्या चाललेल्या रामदाश्याकडे पहात शेटजी बोलत होते आणि बोलतां बोलतां मधून मधून त्या रामदाश्याला नमस्कार करीत होते!

मीं शेटजींकडे पाहिलें.

त्या वेळेला त्यांच्या डोळ्यांत माणुसकीशिवाय दुसरी कसलीच जात मला दिसत नव्हती!

---

## सखाराम : : : १

कधींही न चिडणारा सखाराम आज खूपच चिडला होता. घरांत सर्वांना तें फारच चमत्कारिक वाटलें. कितीही आणि कसलेंही काम पडलें तरी वेळीं न सांगतांही हौसेनें करणारा सखाराम त्याचें नेमून दिलेलें काम करण्याकडेही आज लक्ष देईना !

—आणि आजच त्याच्या मालकाच्या मुलीचें लग्न ठरलें होतें.

—मालकाच्या घरचें तें शेवटचेंच कार्य होतें. सखाराम त्या वरीं आज सहासात वर्षें नोकरीला होता. त्या अवधींत मालकाच्या दोन मुलींचीं लग्नें झालीं होतीं आणि आतां हें तिसऱ्या व शेवटच्या मुलीचें लग्न ठरलें होतें.

—मालकाच्या तिन्ही मुली एकाखालोखाल सुंदर होत्या. म्हणजे थोरली मुलगी खूपच सुंदर होती, मधली अगदीं वाईट नव्हती म्हणूनच तिला सुंदर म्हणावयाचें. आणि आज जिचें लग्न ठरलें होतें ती तर कुरूपच होती ! सौंदर्यसाधनांचा ती मुक्तहस्तानें उपयोग करी म्हणून तिच्याकडे क्वचित् पहावेंसें तरी वाटे— आणि जर

ती आहे तशी लोकांना दिसली असती तर—

—सखारामाचें वय आज तिशीच्या घरांत होतें. तो अंगारूपानें ठसठशीत होता. शिक्षण मॅट्रिक पास. स्वभावतःच निर्व्यसनी—ठाकठिकीनें राहणारा ! सरकारी नोकरी मिळणें अशक्य ठरल्यामुळें तो या खाजगी नोकरींत शिरला होता. त्याच्या मालकाची एक लहानशी पेढी होती. सखाराम त्या पेढींत नोकर होता. पण स्वभावानें सालस आणि वृत्तीनें निर्व्यसनी म्हणून मालकानें त्याची राहण्याची सोय आपल्या घरींच केली होती. तो एका खाणावळींत जेवायला जाई आणि राहील त्या पैशांत कपड्या-लत्त्यांची चैन व त्याचा एकुलता एक सिनेमाचा शोक तो भागवीत असे !

सखारामाला आई होती व दोन धाकटे भाऊ होते. तीं त्याच्या गांवीं असत. त्यांच्यापुरतें घरीं उत्पन्न होतें. आईनें त्याला सत्रादा लग्नाबद्दल विचारलें—सखाराम नकार देई किंवा 'इतक्यांत काय घाई आहे?' असें उर्मटपणानें विचारी !

—पण सखारामाला आजच चिडायला आणि त्रिथरायला काय झालें होतें ?

—सखारामाच्या मालकाला दोन मुलगे होते. ते सखारामापेक्षांही सुमार बुद्धीचे होते. त्यांचीं लग्नें झालेलीं होतीं. दोघांनाही सुंदर बायका मिळाल्या होत्या.

—मालकाच्या थोरल्या मुलीचें लग्न झालें– ती रूपानें सुंदर होती; पण तिला नवरा साधारणच मिळाला होता. त्याची घरची नांवापुरतीच श्रीमंती होती !

—दुसऱ्या मुलीचेंही जवळ जवळ तसेंच होतें.

—आणि तिसऱ्या मुलीला पत्करणाऱ्या वीराला तर रूपही

अगदींच सुमार होतें. त्याची परिस्थितीही साधारणच होती.

—आणि तें ठरलेलें लग्न कळल्यापासून सखाराम चिडला होता.

—माणसाच्या मनाला जशी कांहीं तरी कर्तबगारी करून मोठेपणा—भाग्य—मिळण्या-मिळविण्याची आशा-अपेक्षा असते त्या-प्रमाणें योगायोगानें— नशिबानें— मोठेपणा आणि भाग्य मिळविण्याची आशाही प्रत्येकाला असतेच असते. लॉटरीचें बक्षिस आपणाला मिळावें असें कोणाला वाटत नाहीं ? अगदींच हावरे असतात ते तिकिटें काढून नशिबाला कौल लावून निराश होतात आणि बाकीचे पहिल्यापासूनच हात पांघरून स्वस्थ बसतात !

—बक्षिस मिळण्याची खात्री दिली तर लॉटरीचें तिकीट काढ-ण्याचा मोह होणार नाहीं अशीं किती माणसें भेटतील ?

—सखारामही तसाच होता. बरें, तो जिथें नोकरीला होता तीं माणसेंही इतकीं सालस, मायाळू आणि मोठ्या मनाचीं होतीं कीं कदाचित् या घरांतही आपला योगायोगानें फायदा होईल अशी सुप्त आशा सखारामाच्या मनांत केव्हांपासून तरी जागृत झालेली होती !

—पण कोवळ्या आशेचा हिरमोड माणसाला तितका जाणवत नाहीं.

—मालकाच्या जेव्हां अगदीं पहिल्या सुंदर मुलीचें लग्न झालें तेव्हां सखारामाची कोवळी आशा थोडीशी चुरगाळली गेली !

—ती मुलगी सखारामाशीं फार मोकळ्या मनानें वागत असे. आणि तरुण मनाच्या सखारामानें याचा निराळा अर्थ घेतला. पण तो त्या मुलीच्या मनांत केव्हांही आला नव्हता. आपल्या घरीं नोकर असलेल्या तरुणाबद्दल श्रीमंताच्या मुलीला ती आणि तसली

भावना शिवतच नाहीं, आणि तसली भावना दर्शविण्याचें धाडस सुद्धां सखारामाजवळ नव्हतें.

—तिचें लग्न ठरलें आणि यांत आपल्याला कांहीं अन्याय झाला आहे असें सखारामाला सुद्धां वाटलें नाहीं ! ती त्याची एक भोळी आशा होती.

—आणि इतक्या सुंदर मुलीला आपण योग्य आहोंत असेंही त्याला कधीं वाटलें नाहीं. पण नशीब योग्यायोग्यतेचा प्रश्न कधीं फारसा पहात नाहीं असें माणसाला वाटत असतें आणि माणसाच्या मनाचा चातक पक्षी आशेची चोंच उघडून सदैव उभा असतो !

—नंतर मालकाच्या दुसऱ्या मुलीच्या लग्नाची भाषा घरांत चालू झाली. त्या वेळीं मात्र सखारामाची आशा खूपच वाढली होती. ती मुलगी साधारणच होती ! आणि आपली आशा इथें सफळ होईल असें सखारामाला आतां सारखें मनांतून वाटत होतें ! ती मुलगी सखारामाशीं जास्त मोकळ्या मनानें हसे खेळे. सखारामाला ती कधीं फुलें आणावयाला सांगे, कुठें अवेळीं एकटें बाहेर जाण्याचा प्रसंग आला तर ती सोबत म्हणून सखारामाला बरोबर घेऊन जाई.

—आणि त्या मुलीचें यांत काय चुकत होतें ? सखारामाला ती घरचा सालस नोकर म्हणून हक्कानें बरोबर घेऊन जात असे.

—आणि आशावेडा सखाराम निराळ्याच भावनेनें तिच्याकडे पाहत असे.

—आणि एक दिवस त्या मुलीच्या लग्नाबाबत सखारामाचा झालेला अपमानास्पद उल्लेखही सखारामाला मानाचा वाटला.

—कोणीं तरी एक स्थळ सुचविलें होतें. तें अगदींच साधारण होतें. त्यावर त्या घरच्या माणसांपैकीं कोणीं तरी जाणत्यानें उत्तर दिलें, "हें स्थळ पत्करण्यापेक्षां मग आमचा सखाराम काय वाईट आहे ?"

—सखारामाच्या आशेचा आतां वृक्ष झाला होता. आणि त्याला वाटे, "आहेत कुठं चांगलीं स्थळं गांवांत ? शेवटीं ही मुलगी आपल्यालाच मिळणार !"

—पण एक दिवस तिचेंही लग्न ठरलें.

—आणि सखारामाला या आतां धाकट्या मुलीची जास्त खात्री-शीर आशा वाटूं लागली. या आशेच्या रानांतून फिरतांनाच तो बाहेर म्हणे, "आपल्याला इतक्यांत लग्न करायचं नाहीं !"

—आईला तो लग्नाचा नकार याच आशेवर देत होता.

—सखाराम तसा इतर बाबतींत आशाळभूत नव्हता. तो वाग-ण्यांत करारी होता, अभिमानी होता ! पण कासवाची पाठ टणक असली तरी पोट मऊ असतें ! अत्यंत निष्ठुर वाटणाऱ्या मना-लाही कुठें तरी कोमलतेचें अस्तर असतेंच !

—आणि त्या शेवटच्या कुरूप मुलीचाही सखारामावर जीव जडला होता. आपल्या विद्रूप रूपामुळें कुठें तरी श्रीमंत घराण्यांत आबाळीचें आयुष्य काढण्यापेक्षां सखारामासारखा—

—या कल्पनेचं त्या मुलीला सुख वाटे. पण लगेच व्याव-हारिक आयुष्याकडे पाहिलें कीं तिला ती कशीशीच वाटे. आपल्या घरच्या नोकराशीं लग्न ?—त्यामुळें तिची सखारामाबद्दलची कल्पना वाढतही नव्हती आणि खुरटतही नव्हती ! अवाढव्य घरांत एखादा ससा पाळावा त्याप्रमाणें त्या मुलीच्या मनांत ती कल्पना कधीं कधीं

लहानखोर सशाप्रमाणें वागडे.

—सखाराम त्या घरीं पंधरा रुपयांवर नोकरीला राहिला होता आणि सात वर्षांत पंचवीस रुपयांवर आला होता. हे पंचवीस रुपये त्याला गेल्या तीन वर्षांपासून मिळत होते. आणि त्यानंतर त्यानें पगारवाढही कधीं मागितली नाहीं आणि मालकानें कधीं आपण होऊन ती दिली नाहीं.

सखारामाला वाटे पगारवाढ आपण मागितली आणि मालकानें ती दिली नाहीं तर स्वाभिमानानें आपल्याला पुढें येथें नोकरी करतां येणार नाहीं. आणि आपण जर नोकरी सोडली तर—

—त्याची आशा त्या कुरूप मुलीच्या रूपानें लगेच त्याला डोळ्यांसमोर दिसूं लागे !

—पगारवाढ न मागतांच तो आतां जास्त जिव्हाळ्यानें तेथें नोकरी करूं लागला.

—ती कुरूप मुलगी बायको म्हणून मनानें पत्करण्यांत सुद्धां सखारामाचें केवढें धाडस होतें ! तो त्या मुलीवर अजिबात लुब्ध नव्हता—ती आपल्या मालकाची मुलगी आहे, ती आपण मिळविण्यांत मोठेपणा आहे, असें फक्त सखारामाला वाटत होतें !

—पण त्याही मुलीचें लग्न ठरलें, अगदीं नक्की झालें—तीथ ठरली. वार—घटका—पळेंसुद्धां ठरलीं.

—आणि हें कळल्यानंतर मात्र सखाराम खूप चिडला.

—आपला मालक भयंकर अन्यायी आहे असें त्याच्या मनानें ठाम घेतलें. अशा मालकाच्या हाताखालीं नोकरी करणें हें सुद्धां पाप आहे असें त्याला वाटूं लागलें. तो मनांतल्या मनांत पुटपुटत होता, "अरे काय, आहे काय हें ? मोठी मुलगी मला दिली

नाहींत—मला येवढें विशेष वाटलें नाहीं—ती होतीच फार सुंदर! बरं, तिच्यापेक्षां धाकटी—ती तर साधारण होती ना?—ती सुद्धां नाहीं—बरं, त्या दोन नाहींत तर नाहींत —पण ही कुरूप मुलगी सुद्धां मला देण्याचें औदार्य नाहीं? मी तुमच्या येथें नोकरी करीत असतांना हा काय न्याय आहे? बरं, तिला तरी असें काय ठिकाण पाहिलें तुम्हीं—तिच्यासारखाच बोजड रूपाचा—बरं, श्रीमंत श्रीमंत असा तरी काय आहे?—छेः! नाहीं आपल्याला हें सहन होत आतां—असल्या पापी चांडाळाच्या हाताखालीं आतां इतःपर नोकरी शक्य नाहीं!"

अर्थात् हें सर्व मनांतल्या मनांत!

सखारामाची धुसफूस चालू झाली. तो कोणत्याच कामाकडे लक्ष देईना. तो आपले दिवस कसे तरी भरीत होता.

—आणि त्याच्या त्या धुसपुसण्याकडे फारसें कोणीं लक्ष दिलें नाहीं, एवढेंच नव्हे तर सर्वांनींच काणा डोळा केला.

—आणि मालकाच्या त्या शेवटच्या कुरूप मुलीचें लग्न मात्र मोठ्या थाटांत समारंभानें पार पडलें.

* * *

—आतां सखारामाला त्या घरांत करमेना! खरें सौख्य नाहीं तर नाहीं, पण आशा होती तीही नाहीं! सखारामानें ठरविलें, नोकरी सोडायची. असें नुसतें जगण्यांत तरी काय अर्थ आहे? कुठेंही मिळेल आपल्याला नोकरी. मध्यें चारसहा महिने तरी बेकार काढावे लागतील कदाचित्! काढूं तेही आपण आनंदानें! मला आतां कंटाळा आला आहे त्या ठराविक दिवशीं पगार घेण्याचा आणि तेच तेच परीटघडीचे कपडे घालून गांवांत हिंडायचा! बरं, पण नोकरी

सोडण्याकरितां मालकाला कारण काय सांगायचें ? पगार पुरत नाहीं, माझें येवढ्यांत भागत नाहीं !—आणि खोटें काय आहे त्यांत ? पांच सहा सिनेमा महिन्यांतून—परीटधोबी, चहापाणी, खानावळ —जवळ काय रहातें आहे माझ्या महिन्याअखेर ? बस्स ! हेंच कारण सांगायचें !

—पण इतक्यांत सखारामाला एक भयंकर शंका आली.

—आपण पगारवाढीकरितां नोकरी सोडतों म्हणून सांगितलें— आणि समजा मालकांनीं झटकन आपला पगार वाढवला तर ?

—पण आपण पगारच इतका मागूं या कीं मालकाला तेवढा देण्याचें धाडसच होऊं नये ! बस्स ! आपल्याला पंचवीस रुपये पगार आहे. मालकांनीं किती पाहिजे म्हणून विचारलें तर एकदम पन्नास रुपये मागायचे !

—बस्स् ! एकदम पन्नास ! आणि तेही त्यांनीं देतों म्हटलें तरी नोकरी सोडायची ! मुख्य म्हणजे इथें आपल्याला आतां नोकरी करायची नाहीं ! पहिली सुंदर मुलगी नाहीं— दुसरी साधारणही नाहीं— आणि अखेर शेवटीं अगदीं कुरूप तीही नाहीं ! अरे, काय न्याय आहे का नाहीं जगांत ? पण आतां त्रागा करून तरी काय उपयोग ? ती कुरूप मुलगी तरी आपल्याला थोडीच मिळणार आहे ? बस्स् ! इथून नोकरी सोडायची आणि दुसरीकडे धरायची. आणि पुनः नोकरी धरली तरी त्या घरांत आपली राहण्याची व्यवस्था पाहावयाची नाहीं. आणि अगदीं तशीच वेळ आली तर रहायलाही हरकत नाहीं तिथं. पण मालकाची मुलगी लग्नाची नाहीं असतां कामा त्या घरांत !

—असें कांहीं तरी सखारामाचें ठरलें !

—पण त्याच्या मनाचें धाडस होईना. अखेर शेवटीं या महिना-

अखेर आपण नोकरी सोडणार असा त्यानें आपल्या मनाला दम दिला. आणि धुसफुसत त्यानें आपली नोकरी चालू ठेवली !

—अखेर तो दिवस उजाडला. आज महिनाअखेर होती.

—मालकाचें सखारामाच्या वागणुकीकडे पहिल्यापासून पूर्ण लक्ष होतें.

त्या दिवसाच्या सुरवातीलाच सखारामानें मालकाला सांगितलें,

"मला नोकरी सोडायची आहे. चालू पगारांत माझें भागत नाहीं !"

मालकाची जणूं हें ऐकण्याची मनाची तयारी पहिल्यापासूनच दिसली.

"केव्हांपासून जाणार नोकरीवरून ?"

"आपण सोडलेंत तर आजपासून सुद्धां !"

"दुसऱ्या कुठं मोठ्या पगाराची नोकरी पाहून ठेविली आहेस ?"

"नाहीं !—"

"ठीक आहे—जा. तुझा तूं मुखत्यार आहेस. पण एक महिन्याच्या नोटिशीशिवाय तुला नोकरी सोडतां येणार नाहीं !"

"ठीक आहे. पुढच्या पहिल्या तारखेपर्यंत माझी थांबायची तयारी आहे !"

तो विषय तितकाच थांबला आणि दिवसाचें काम चालू झालें.

'आपण अचानक नौकरी सोडून जाणार आहोंत' हें कळून सुद्धां कोणाला कसें आश्चर्य वाटलें नाहीं याचेंच सखारामाला आश्चर्य वाटलें !

सखारामाचा मालक जाणिवेचा होता. सखारामाची खर्चिक वागणूक पाहूनच त्यानें त्याची पगारवाढ थांबविली होती. आणि सखाराम लग्न करून संसारांत पडला कीं लग्नाच्या वेळीं त्याला

कांहीं तरी उचलून द्यायचें त्यानें ठरविलें होतें आणि मग तो पगारवाढ करणार होता. आणि आपल्या घरांतल्या कार्यांतून सुटलों कीं सखारामाच्या लग्नाचें बघावयाचें असाही त्याचा विचार होता.

—पण सखाराम नोकरीच सोडून जावयाला निघाला!

* * *

अशांत वीस दिवस निघून गेले.

एकविसाव्या दिवशीं मालकांनीं हांक मारली, "सखाराम—"

'आतां इथं नोकरी करायची नाहीं' हा आपला विचार संभाळीत सखाराम मालकापुढें जाऊन उभा राहिला. आणि मालक आतां आपल्याला नोकरीवर रहाण्याबद्दल आग्रह करणार या खात्रीनें तो मालकापुढें जरा ताठ्यांतच जाऊन उभा राहिला.

मालक कोणाचा तरी एक फोटो हातांत घेऊन त्याकडे पहाण्यांत दंग होते.

एक–दोन–तीन– किती तरी मिनिटें गेलीं.

ताठ मनानें मालकासमोर आलेला सखारामही आतां आळसला होता.

तोंच आळस देत मालकांनीं सखारामाला विचारलें, "अरे उभा कां? बस ना असा! तुझे माझे नोकर-मालकाचे संबंध आतां थोड्या दिवसांपुरते उरले आहेत. ये, बस असा इथं—"

सखाराम लाजत तिथें बसला.

अगदीं सहज आणि हेतूशिवाय धरल्याप्रमाणें मालकांनीं आपल्या हातांत असलेला फोटो सखारामासमोर धरला आणि विचारलें, "लग्न वगैरे करायचा विचार आहे का नाहीं तुझा?"

सखाराम त्या फोटोकडे पहातांच सर्द झाला. त्या फोटोनें

तो भारला गेला. मालकांचा प्रश्न ऐकू येऊनही त्याला त्याचा अर्थच कळेना !

मालकांनीं पुनः विचारलें, "लग्न करायचा तुझा विचार आहे का नाहीं ?"

सखारामाला काय उत्तर द्यावें तें कळेना. तो बावचळून गेला. नोकरीविषयीं बोलणें निघेल ही त्याची अपेक्षा आणि लग्न–

"तुझं कांहीं ठरलं नसलं नक्की तर एक दोन दिवसांत विचार करून सांग मला — ही माझ्या एका लहानपणच्या साधारण गरीब स्नेह्याची मुलगी लग्नाची आहे. त्यानं तुझ्याकरितां मला गळ घातली. मी त्याला तूं येथून नोकरी सोडून जाणार असल्याचं सांगितलं. तरी पण पहा तुला मुलगी पसंत असली तर —" फोटो टेबलावरच टाकून मालक तेथून नाहींसे झाले.

—तो फोटो पाहून सखाराम बधिरच झाला !

—त्याला नोकरी सोडावी का लग्न करावें कांहींच कळेना !

—तो— तो फोटो हातीं घेऊन –जवळ लांब– करीत तो एकसारखा पहात होता आणि त्याला वाटलें, 'आपण केवढे भाग्यवान– मालकानें ती आपली कुरूप मुलगी आपल्या गळयांत बांधली असती तर ही मुलगी– हें चित्र– हें सौंदर्य– ही रूपखाणी– पुष्पराणी–' वगैरे वगैरे !

आणि दुसऱ्या दिवशीं– तिसऱ्या दिवशीं– मालकानें त्याला त्याच्या लग्नाबद्दल कांहीं विचारलेंच नाहीं ! सखाराम आशाळभूतासारखा कांहीं तरी निमित्त काढून मालकाची गांठ घेई पण–

—अखेर एकदां मालकांचे ओठ हलले.

पण भलतेच शब्द त्याच्या कानीं पडले.

सखाराम आशाळभूतपणें ऐकूं लागला.

"काय रे पहिल्या तारखेला सोडणार ना नोकरी तूं ?"

सखाराम खजील झाला. तो तिथून निघून जात म्हणाला, "दिवसांमानानं येवढ्या पगारांत माझं भागत नाहीं !"

"बरं चाललास कुठं ? आपल्याला आतां बाहेर जायचं आहे !"

मालक आणि सखाराम बाहेर पडले !

आणि ते एका जुनाट घरांत आले. कुणीं तरी त्यांचें आदरानें स्वागत केलें.

—आणि थोड्याच वेळांत दोन तीन दिवसांपूर्वी पाहिलेली फोटोंतली निर्जीव मुलगी सजीवपणानें त्याच्यासमोर येऊन उभी राहिली !

  

"मग काय मुलगी पसंत आहे ना आपल्याला ?" सखारामाला त्या मुलीचा बाप नंतर दोन तीन दिवसांनीं विचारीत होता.

"हूं—"

"हूं मग पुढं ?"

"मालकांनाच विचारा काय तें—त्यांच्याबाहेर मी नाहीं !"

तोंच मालक तेथें आले.

"मग काय तुम्हांला पसंत आहे म्हणतां जावई ? मलाही कांहीं त्याच्यांत न्यून वाटत नाहीं—पण बेटा खर्चिक आहे. मी त्याला पंचवीस रुपये पगार देतों आणि तेवढ्यांत त्याचं एकट्याचं भागत नाहीं म्हणे—ह्याच्याबद्दल आपल्याला कांहीं विचार करावयाचा असेल तर—"

पुष्कळ वेळेला इच्छा असूनही माणसाला आपलें मन चोरून

ठेवतां येत नाहीं. अशी हातीं आलेली शिकार आपल्या डोळ्यांदेखत आपल्या हातून निसटून जात आहे अशा तळमळीनें सखाराम उद्गारला, "अहो, पंचवीस रुपयांत एका माणसाचं भागत नाहीं—दोन माणसांचं भागायला काय हरकत आहे ?"

—हा काय विचित्र हिशेब आहे !

* * *

सखारामाचें त्याच मुलीशीं लग्न झालें. त्यानें बिऱ्हाड केलें. त्याला पगारवाढ मिळाली नव्हती. ज्या दिवशीं नोकरी सोडायची त्याची तारीख होती त्याच दिवशीं त्याचें लग्न होतें. त्यामुळें त्याला नोकरी सोडायला वेळच झाला नाहीं आणि पुढें तो विषयच निघाला नाहीं !

—बहुधा रात्रीं सिनेमाच्या थिएटरांत सांपडणारा सखाराम हल्लीं घरींच असतो. आतां तो पूर्ण आशावादी झाला होता !

—एक दिवस तो आपल्या घरीं खुशींत गप्पागोष्टी सांगत बसला होता. तोंच त्याच्या मालकाची ती कुरूप मुलगी त्याच्या दारीं आली ! आतां तिच्याकडे तो पाहायलाही राजी नव्हता !

उलट तिच्याकडे पाहून त्याला घामच सुटला. त्याला त्याच्या मनांतील पूर्वीच्या आठवणी आठवल्या आणि 'आपण केवढ्या कुरूपतेंतून सुटलों' अशा कल्पनेचा त्यानें मनमोकळा श्वास टाकला !

"या—या ताई ! अग, त्यांना बसायला पाट दे" असें त्यानें लगेच आपल्या नूतन पत्नीला सांगितलें.

सखारामाला आतां मनांतल्या मनांत तत्त्वज्ञान का काय म्हणतात तें सुचूं लागलें होतें !

"एक निराशा दुसऱ्या आशेला जन्म देते ! माणसाच्या

आशा, कल्पना, महत्त्वाकांक्षा नेहमीं बदलत असतात ! संपूर्ण दुर्दैवी मनुष्य जगांत नाहीं ! माझ्या कुरूप आशेचें निराशेंत रूपान्तर झालें पण निराशेंतून ही किती सुंदर आशा फुलली !" अखेर कल्पना सोडून सखाराम प्रत्यक्षाकडे पाहूं लागला.

सखाराम आपल्या सौभाग्यवतीकडे किती कौतुकानें पाहत होता !

त्या कुरूप ताईनें चांदीच्या ताम्हणांत घालून कांहीं दागिने आणले होते ते सखारामाच्या सौभाग्यवतीपुढें ठेवीत ती कुरूप मुलगी सखारामाला म्हणाली,

"ही तुमची राहिलेली पगारवाढ बाबांनीं या स्वरूपांत दिली आहे आणि या महिन्यापासून आपल्याला पन्नास रुपये पगार केला आहे. तुमचं लग्न झाल्यापासून आमची कांहीं फारशी आठवण होत नाहीं तुम्हांला !"

नंतर पांच दहा मिनिटें कोणीच कांहीं बोललें नाहीं. खऱ्या गोष्टी बोलून दाखविण्यांत काय अर्थ आहे या जाणिवेनें सखाराम कांहींच बोलला नाहीं !

सखारामाचा मालकही 'सखाराम कसा बनला' या खुशींत होता. पण सखाराम पगारवाढीकरितां अडला नव्हता— त्याच्या मुलीवर त्याचें लक्ष होतें हें गुपित मालकाला केव्हांच कळलें नाहीं !



## विकास ! : : : १०

पुष्कळ वेळेला माझें असे होतें कीं एखाद्या माणसाकडे माझें लक्ष वेधलें कीं त्यांतच मी इतका रंगून जातों कीं वेळेला माझीं नित्य-नैमित्तिक कामेंही त्यामुळें थंडावतात ! आणि माझें लक्ष वेधून घेणारीं माणसेंही कांहीं मोठीं नामांकित असतात असें नव्हे.

जवळ जवळ वर्षापूर्वी आमच्या शेजारीं एक नवें बिऱ्हाड आलें. त्या बिऱ्हाडांतील मुख्य माणसानें माझें लक्ष आल्यापासून वेधून घेतलें आहे. गृहस्थाची उंची सहा सव्वासहा फुटांखालीं तरी नक्की नव्हती. असें असून तो अंगानें अत्यंत सडपातळ होता त्यामुळें त्याची उंची जास्तच लक्षांत येई ! रंगानें पांढुरका गोरा, केसही पांढरे पडत चाललेले. फक्त डोळे मात्र एकदम काळे भोर ! त्याचा पोषाखही अत्यंत साधा होता. त्याच्या पोषाखाचा सर्व रंग पांढरा असे. डोक्याला पांढरा रुमाल, अंगात पांढरा कोट, त्याचीं बटनेंही सुतीच, पायांत करकर आवाज करणाऱ्या कोंकणी वहाणा. त्यामुळें तो केव्हांही घरांतून बाहेर पडला तरी मला त्याची चाहूल

लागे आणि घरीं परत यायच्या वेळेला तर लागेच लागे. त्याचें वय होतें पन्नाशीच्या जवळ जवळ. घरीं पांच सात माणसांचा संसार होता. एक घरीं आलेली बहीण, तीन मुलगे, चार मुली आणि त्याची बायको.

—पण घरांतील ही सर्व मंडळी इतकी खुजी होती कीं बोलायची सोय नाही. सर्वजण तशीं आपआपल्यापरी नीटस होतीं; पण उंचीला कमी! त्या सर्व माणसांकडे पाहून कौतुक वाटे, आनंद वाटे; पण त्याच वेळेला वाटे कीं हीं माणसें खुरटलेलीं आहेत– आक्रसलेपणानें वाढलेलीं आहेत.

—त्या माणसाला आरती-धुपारतीचा फार नाद असे आणि आरतीच्या वेळीं घरांतल्या सर्व माणसांनीं हजर असायला पाहिजे असाही त्याचा अट्टाहास असे. कधीं कधीं तो प्रसंग मला पहायला मिळाला आहे! हा उंच मलखांब मधें आरती करीत उभा आणि हातांनीं फिरवायच्या तालमींतील जोड्यांप्रमाणें तीं सर्व खुजीं माणसें—मोठें चमत्कारिक दिसे तें! एखाद्या दिवशीं तीं सर्व माणसें एकदम बाहेर पडलीं आणि हाही त्यांच्यांत असला कीं रस्त्यानें मेंढरें वळीत चाललेल्या धनगराची मला आठवण होते! हें वर्णन त्यांच्या संबंधाचें किंवा एकमेकांशीं असलेल्या वागणुकीचें करीत नाहीं हं मी! केवळ आकाराचें, दृश्याचें, त्याच्या उंचीचें आणि इतरांच्या खुजेपणाचें! खरोखर मेंढरांचा कळप आणि धनगराची आठवण होई त्यांच्याकडे पाहून!

त्या गृहस्थाला पगार मात्र कांहीं तरी बराच असावा. कारण त्याच्या घरांत खर्चिकपणा बराच दिसत असे. पण गृहस्थाच्या नोकरीची वेळ मात्र बरीच चमत्कारिक होती. तो सकाळीं आठला

कामाला जात असे तो दुपारीं बाराला जेवायला यायचा आणि लगेच हातावर पाणी पडलें कीं कपडे करून नोकरीवर जायचा, तो परत यायचा रात्रीं आठानंतर !

नोकरी बहुधा कांहीं तरी खाजगी होती. त्याला रविवारची सुद्धां सुटी नसे. महिन्यांतून फक्त अमावास्येला तो घरीं दिसायचा !

गृहस्थ उठत असे पहाटे पांचलाच ! कारण तो शेजारीं आल्यापासून आम्हीं घड्याळाला अलार्म द्यायचें अजिबात बंद केलें होतें. कारण त्याची पूजा अर्चा होऊन आरतीकरितां घंटा वाजविण्याची वेळ यायची तीच आम्हाला अलार्मच्या ऐवजीं उपयोगीं पडायची !

नंतर पांच दहा मिनिटें त्याचें कांहीं तरी वर्तमानपत्रवाचन चाले. तो एक फक्त 'त्रिकाळ' विकत घेत असे. पण त्याचीं मतें होतीं कॉंग्रेसच्या बाजूचीं !

एकदां कोणीं तरी त्याला विचारलें, "का हो ! तुम्ही कॉंग्रेसच्या बाजूचे ना ? मग 'त्रिकाळ' कां घेतां ? कॉंग्रेसचीं काय वर्तमानपत्रं नाहींत ?"

"पण मला आपला 'त्रिकाळ'च बरा वाटतो. आम्ही म्हणतों फार तर उलट्या बाजूचें लिहीत असतील– आम्ही वाचतांना त्याच्या विरुद्ध समजूं म्हणजे झालें ! पण मत सोडून द्या पेपर जिवंत वाटतो !"

हें पांच दहा मिनिटांचें वर्तमानपत्रवाचन झालें कीं लगेच गृहस्थ पिशवी घेऊन मंडईला जायचा. मंडई आणून घरीं टाकली कीं लगेच नोकरी !

संध्याकाळीं घरीं आला कीं लगेच जेवण, आणि मग स्वारी देवदर्शनाला निघे. तो परत यायचा दहाला, कीं संपला दिवस !

त्याच्या नोकरीमुळें त्याला खाजगी जीवनांत फक्त पांच एक तास घालवायला मिळत. त्या पांच तासांत दोन जेवणें, पूजा, अंघोळ– तीन तास खलास. राहिलेल्या दोन तासांत एक तास देव-दर्शनें व एका तासांत मंडई आणि वर्तमानपत्रवाचन ! त्यामुळें तें एक माणसाचें यंत्र निर्माण झालें होतें.

तो सकाळीं जीं पोथ्यापुराणें वाची त्याचा परिणाम त्याच्या मनावर कायम राही. आणि नंतर तो देवळांत गेला कीं देवाच्या मूर्तीमध्यें ते चमत्कार त्याला कल्पनेनें दिसूं लागत ! आणि मग त्याचें त्यालाच गहिंवरून येई ! तो एकदां एखाद्या देवळांत शिरला म्हणजे वीसपंचवीस मिनिटांची निचिंती ! पण त्यामुळें दिवसभर झालेले त्याचे सर्व श्रम परिहार होत !

पण एक दिवशीं मला त्याच्या आयुष्यांत एक विचित्रच दृश्य दिसलें. तो रात्रीं आपलें देवदेवतार्चन आटोपून घरीं परत येत होता. त्याच वेळेला रस्त्यानें एक वेडा चाललेला होता. तो वेडा आहे हें मला माहीत होतें म्हणूनच मी त्याला वेडा म्हणतों आहें. पण तो दिसे शहाण्यासारखाच. कपडे वगैरे सर्व व्यवस्थित. त्याचें वेड फार साधें होतें. तो चालतां चालतां एकदम रस्त्यांत थांबे; कुणाकडे तरी बघून हसे; मध्येंच एखाद्या माणसाकडे पाहून मूठ उगारी; मग भराभर नुसती ओठांची पुटपुट चाले ! मग तो जो एकदम आपल्या चालण्यास वेग घेई तो अनिवारच ! तो आपल्या जाण्याच्या दिशा उलट सुलट वाटेल तशा बदली. आणि या त्याच्या चालण्याच्या गतीमुळें तो एखाद्या वेळीं एका रस्त्यांतच सबंध दिवस काढी ! हसायला लागला म्हणजे हसतच सुटे ! एखाद्या वेळीं त्याला नुसती रडायची लहर येई ! मग नुसता श्वासोच्छ्वासाचा

भाता चाललेला आणि डोळ्यांतून आसवांच्या धारा ! त्याला वेड कां लागलेलें होतें हें मात्र मला माहीत नव्हतें.

त्या वेड्याची आणि याची नजरानजर झाली. आणि आश्चर्याची गोष्ट, तो त्या वेड्याच्या हालचालींतच रंगून गेला ! किती तन्मयतेनें ! एखाद्या उल्लूनें एखाद्या नजरेंत भरलेल्या स्त्रीचा ध्यास घ्यावा— तिचा पाठलाग करावा— इतक्या तन्मयतेनें ! त्या वेड्याच्या हालचालीकडे पाहून याला कसलें तरी समाधान वाटलेलें दिसत होतें. जणूं कांहीं त्या वेडयाच्या हालचालींत त्याला कसली तरी आत्मप्रचीति दिसत होती !

आणि देवाच्या जोडीला तो त्या वेड्याचाही भक्त झालेला माझ्या लक्षांत आलें.

असा आज कितीतरी दिवसांचा कार्यक्रम चाललेला मी पहात होतों. एके दिवशीं तो अचानक माझ्याकडे आला आणि बाहेरूनच माझें नांव न घेतां त्यानें विचारलें,

"आहेत का ?"

मीं त्याचा आवाज ओळखला आणि म्हटलें, "या कीं !"

तो आंत आला. पण अत्यंत आदरानें लांबच बसला.

"कां ? आज विशेष ?"

"कांहीं नाहीं ! उगाच आलों होतों." येवढें उत्तर देऊन त्यानें माझ्याकडे पाहण्याचेंच टाळलें आणि माझ्याजवळ पडलेलीं वर्तमानपत्रें तो चाळूं लागला.

आज अमावास्या होती. त्या मनुष्ययंत्राला आज त्याची दैनंदिन गति मिळायची नव्हती.

कांहीं वेळानें वर्तमानपत्रांतून माझ्याकडे पहात त्यानें मला

विचारिलें,

"आपण लेखक आहांत नव्हे?"

मीं नुसताच हुंकार दिला.

"मला माझ्या जीवनांतल्या कांहीं शंका आपणांस विचारायच्या आहेत —" तो पुन्हा खालीं पाहूं लागला.

आणि मी वर पाहूं लागलों. लेखकाबद्दल त्याच्या भलत्याच अपेक्षा दिसल्या.

"आपल्याला मनुष्यस्वभाव चांगला कळतो?"

"ही भयंकर बातमी कुणीं सांगितली तुम्हाला?"

"पण साधारण लेखकांना मनुष्यस्वभावाचें ज्ञान खूप असतें असें समजण्यांत येतें!"

"ती तुम्हां लोकांची चूक आहे; आमची नाहीं. मनुष्यस्वभाव समजणं हें काय सोपं काम आहे असं तुम्हाला वाटतं?"

"पण तुम्ही लेखक लोक मनुष्यस्वभावाचा अभ्यास करतां ना?"

मी हसत म्हणालों, "हिंदुस्थानांतल्या नद्यांचीं नांवें पाठ करून ठेविलीं म्हणून कांहीं त्यांवर कधीं वादळें होतील, कां होतील, त्यांत जलचर प्राण्यांची वस्ती कुठं राहील हें सांगतां येणं शक्य आहे का? मनुष्यस्वभावाचें ज्ञान मला पूर्णत्वानं आहे असें म्हणणाऱ्या माणसाला तुम्ही खुशाल मूर्खांच्या सदरांत घाला."

"मग तुम्ही लिहीत असलेले मनुष्यस्वभाव, त्यांतील खाचा-खोचा—"

मला आपलें हसणें आवरेना, "अहो, पात्र निर्माण करणार आम्हीच! त्यांचे स्वभाव घडवणार आम्हीच आणि 'त्याचा असा स्वभाव आहे!' असं आम्हीं म्हटल्यानंतर तुम्ही काय करणार?

आणि लेखक व्यवहारांत बहुधा फसलेले आढळतात किंवा निदान त्यांची तशी ओरड तरी असते. आतां तुम्ही असं पहा— तुम्ही म्हणतां तेवढं व्यवहारज्ञान आणि मनुष्यस्वभाव जवळ असलेला लेखक मनुष्य फसतो याचा अर्थ काय ? अहो, सगळं कागदी व्यवहारज्ञान ! कागदावर लिहिलं म्हणजे बरं दिसतं; व्यवहारांत वापरायला काढलं कीं त्याची शोभा जाते !"

"कदाचित् खरं असेलही तुमचं म्हणणं !" त्यानें माझ्याकडे गंभीरपणानें पहात म्हटलें.

"तरी पण," पुन्हा तोच बोलूं लागला, "मीं आपल्याला एक प्रश्न विचारायचा जो ठरविला आहे तो विचारणारच आहें !"

"तुम्हीं प्रश्न विचारण्याबद्दल माझं कांहींच म्हणणं नाहीं हो ! पण तो अगदीं देवाला कौल लावल्याप्रमाणं विचारूं नका ! येवढं-च माझं म्हणणं !"

पण माझ्या बोलण्याकडे त्याचें अजिबात लक्ष नव्हतें. माझ्याही बसायच्या खोलींत एक दत्ताची तजबीर होती. त्या तजबिरीकडे त्याचें लक्ष गेलें होतें.

त्यानें आपले डोळे गंभीरपणानें मिटले. दोन्ही हात जोडून त्या तजबिरीला नमस्कार केला. जोडलेल्या हातांवरच आपलें डोकें टेकलें. मी घड्याळाकडे पाहूं लागलों.

सेकंदकांट्याचीं तीन वर्तुळें घेऊन झालीं होतीं !

तोंच तो जागा झाला वाटतें. त्यानें आपल्या दोन्ही गालांवर हलक्या हातानें गादी झाडावी अशा चापट्या मारून घेतल्या आणि तोंडानें म्हणत होता—

'सद्गुरुराज ! सद्गुरुराज !— मी अपराधी, घ्या पदरांत !'

येवढें झाल्यानंतर माझ्याकडे त्याचें पुन्हा लक्ष गेलें. "हें मधेंच कांहीं तरीच झालं नाहीं! पण आतांचंच नाहीं हें माझं— नेहमींच असं होतं. कुठेंही वाटेमधें देऊळ लागलं कीं माझीं पांच मिनिटं तरी जातातच! त्यामुळं माझ्याबरोबर फिरायला येणाऱ्या माणसाची फार पंचाईत होते. आणि अलीकडे माझ्याबरोबर फारसं कुणी नसतंच म्हणा!"

"बरं, आपण मला काय विचारणार आहांत?" मीं मधेंच प्रश्न टाकला.

"आपल्याला घाई आहे कुठं जायची? मग मी सावकाश येईन पाहिजे तर!"

"नाहीं; मला कुठें जायची घाई नाहीं. तुमच्या प्रश्नाबद्दल माझं खरं औत्सुक्य आहे!"

"माझा प्रश्न म्हणजे विशेष महत्त्वाचा आहे असं नव्हे पण सहज आपली एक गंमत—"

त्याच्या ह्या दिरंगाईनें माझी पूर्ण वाढलेली उत्कंठा जांभयांच्या रूपानें पुन्हा आकुंचन पावूं लागली होती. आणि मला वाटतें त्याच्या दैनंदिन कार्यक्रमांत त्याला बोलायला सुद्धां फार कमी सांपडत असावें. तो घरींही फारसा कधीं बोलत नसेच. त्यामुळेंच आज तो सावकाशीनें आणि दिरंगाईनें बोलत असावा.

कांहीं कांहीं आयुष्यें अशींही असतात! पैशाचें—प्रेमाचें—नात्या-गोत्याचें वगैरे दारिद्य तर आयुष्यांत असतेंच पण कांहीं कांहीं आयुष्यांत तर मनमोकळेपणानें बोलायला सुद्धां सवड नसते! संधि नसते. बोलण्याचेंही दारिद्रय—काय भयंकर चीज असेल नाहीं ती! कल्पनेनं सुद्धां आपल्या अंगावर शहारे येतात.

इतक्यांत तो मनुष्य बोलूं लागला,

"आपल्या कदाचित् लक्षांत आलं असेल कीं मला देवधर्माचा विशेष नाद आहे. सकाळीं मी पूजा करतों– पोथी वाचतों– आणि संध्याकाळीं देवळांत देवाच्या दर्शनाला गेलों कीं देवळाच्या गाभाऱ्यांतच मला मानसिक समाधि लागल्यासारखं होतं आणि सकाळीं पोथींत वाचलेलीं सद्गुरुचरित्रं मला त्या मूर्तीभोंवतीं दिसूं लागतात. पहातांपहातांच मला त्या मूर्तीभोवतीं एक तेजोवलय दिसूं लागतं आणि त्या तेजोवलयाच्या एकएका रेषेंत मला देवतांचे पराक्रम दिसूं लागतात ! ते पराक्रम पाहून मला आनंदाचं समाधानही लाभतं आणि ते पाहून मी एकीकडे घामाघूमही होऊन जातों. पण त्यामुळं माझा साऱ्या दिवसाचा शीण हरतो, डोळेही अश्रूंनीं भरून येतात आणि अर्ध्या अधिक तासानं शान्त होत्साता मी देवळांतून बाहेर पडतों."

"बरं—" त्याला विसावा मिळावा म्हणून मीं एक शब्द मधें उच्चारला.

"पण अलीकडे काय झालंय्– देवळांतून परत येतांना मला वाटेंत एक वेडा भेटतो —"

"बरं !"

"आणि देवाप्रमाणं त्या वेड्यानंही माझं चित्त वेधून घेतलं आहे ! तो वेडा साधारण माझ्या माहितीचा आहे– त्याचं वेडही असंच मोठं गंमतीदार आहे !"

"कशामुळं त्याला वेड लागलं ?"

"—तसा तो वेडाही हाडाचा मोठा सीधा आणि प्रेमळ आहे ! त्याला वेड लागण्यापूर्वीं बोलतां बोलतां सुद्धां त्याच्या डोळ्यांतून पाणी

आल्याचं मीं अनेकवार पाहिलं आहे! इतका तो सहृदय होता!"

"मग त्याला वेड लागण्याचं काय कारण?"

"आयुष्यांत कधींच यश न भेटल्यामुळं सारं जग आपल्याविरुद्ध कट करीत आहे, आपले सारे स्नेही– प्रेमळ हितचिंतक– आपल्याला बुडविण्यासांठीं टपलेले आहेत हा त्याचा समज विनाकारणच बळावत चालला— आणि त्याच भावनेचा अतिरेक होऊन अखेर शेवटीं त्याला वेड लागलं. आतां तो दिसेल त्याला म्हणतो, 'तूं मला बुडविलं आहेस— तूं मला बुडविलं आहेस.' आणि काल तर त्यानं कमालच केली. काल तर तो एका कुत्र्याच्याच पाठीमागं लागला 'तूं मला बुडविलं आहेस म्हणून!' पण तो गृहस्थ जात्याच प्रेमळ असल्यामुळं तो रागावतो सुद्धां प्रेमळपणांतच!"

"फारच भयंकर आहे तुमची हकीकत!"

"— पण त्या वेड्यापेक्षांही माझी स्वतःची हकीकत जास्त भयंकर वाटते मला!"

"ती काय?" मी बोलण्याच्या नादांत उठून उभाच राहिलों.

"देवाच्या मूर्तीकडे पाहून जें मला समाधान वाटतं तें त्या वेड्याकडे पाहून सुद्धां वाटतं! हल्लीं देवळांतून बाहेर पडतांना बहुधा रोज भेटतो मला तो. मी हल्लीं त्याच्या संगतींतही दहा पंधरा मिनिटं घालवितों. आणि याच गोष्टीचं मला आश्चर्य वाटतं आहे! हीच गोष्ट मला भयंकर वाटते आहे! आज गेले एक दोन दिवस मला तो वेडा भेटला नाहीं– माझं रोजचं मानसिक समाधान त्यामुळं ढासळलं आहे! याचं कारण आपण मला सांगूं शकाल?" असें म्हणून तो रस्त्यावरच्या खिडकींतून बाहेर पाहूं लागला.

"काय, बाहेर काय पहातां? कदाचित् तो वेडा दिसेल या

आशाळभूत दृष्टीनं ?"

"किती माझ्या मनांतलं ओळखलंत तुम्हीं ! आणि तुम्ही म्हणतां तुम्हाला मनुष्यस्वभावाचं ज्ञान नाहीं म्हणून ! मला खरंच वाटलं कीं मला त्या वेड्याच्या आठवणीची इतकी लहर आली आहे तेव्हां तो योगायोगानं कदाचित् दिसेलही मला आतां ! माझ्या या प्रश्नाचं तुम्हाला कांहीं उत्तर सुचतं का बघा. तोंपर्यंत मी बाहेर पहात उभा रहातों !"

माझ्या मनाला एक नवी करमणूक मिळाल्यासारखें मला वाटत होतें. मी त्याच्या प्रश्नाचें उत्तर शोधीत होतों. आणि हातांनीं कांहीं तरी चाळा म्हणून माझ्या मुलाची नुसती आवाज काढणारी एक बुचाची बंदूक होती ती मीं हातीं घेतली आणि तिच्याशींच खेळूं लागलों.

आणि विचारांत व्यग्र असतांनाच नकळत ती बंदूक माझ्या हातून उडविली गेली.

त्या आवाजानें त्यानेंही माझ्याकडे पाहिलें.

"आज उत्तर सुचत नसलं तर उद्यां सांगा—"

"उत्तर बरोबर असेल अशी माझी खात्री नाहीं. पण मला सुचलं आहे तें सांगतों—पण आपल्याला राग तर येणार नाहीं ना ?"

"छेः ! काय वाटेल तें मोकळ्या मनानं सांगा. मीं आपणहून तुम्हाला प्रश्न विचारला आहे."

"आतां सांगतों. आपण इथं आमच्या शेजारीं रहायला आल्यापासून माझं लक्ष तुमच्याकडे वेधलं आहे. मी तुमचं आयुष्य इथं बसून टेहळतों आहें."

"अस्सं ! असं माझ्यांत काय अलौकिक वाटलं तुम्हाला ?"

"अलौकिक असं कांहीं नाहीं पण एका विशिष्ट अर्थानं आकर्षक वाटलं मला. आपल्या देहाचं यंत्र झालेलं दिसलं मला ! आपलं शरीर राबत आहे पण आपल्या मनाची कुचंबणा आपल्या लक्षांत आली नसली तरी माझ्या लक्षांत आली आहे ! आपल्या मनाचा वेग– इच्छा-आकांक्षा– सगळ्या कुजत पडल्या आहेत. त्या काय आहेत हें मला समजलेलं नाहीं पण त्याची कुचंबणा लक्षांत आली माझ्या–"

"आपण म्हणतां त्यांत पुष्कळच अर्थ आहे—"

"आणि आपल्या अतृप्त इच्छा-आकांक्षांचा विकास पाहण्याची माणसाच्या मनाला नेहमीं इच्छा असते. एखाद्या जित राष्ट्राची स्वातंत्र्याकरितां चाललेली धडपड पाहून आपली सहानुभूति कां उचंबळते ? आपल्या दबलेल्या आशा-आकांक्षांचा तो विकास असतो. विकास– विकास– माणसाच्या मनाला विकासाचं वेड आहे ! आपल्या आशा-आकांक्षा जिवंत सृष्टींत दबलेल्या असल्या तर नाइलाजानं आपलं मन त्यांचा विकास आपल्याला रोज पडणाऱ्या स्वप्नांत आपण पहातों ! स्वप्नाचं मृगजळ माणसाच्या दबलेल्या मनांतून निर्माण होतं."

"माझ्या प्रश्नाचं याच्यांत उत्तर आहे ?"

"—आहे असं मला वाटतं ! तुमच्या मनांत ज्या कांहीं चांगुल-पणाच्या कल्पना वावरत असतील– पण ज्यांना व्यवहारांत वाव नाहीं– त्यांचा विकास आपण देवांच्या मूर्तींत पाहतां आणि अनुभवितां."

"—आणि त्या वेड्यांत ?"

"—तशाच कांहीं वेडेपणाच्याही सुप्त भावना तुमच्यांत– तुमच्यांत काय, प्रत्येकांत– बहुधा असतातच, त्यांचा विकास आपण त्या वेड्याच्या स्वरूपांत पहातां. पटतं तुम्हांला हें ?"

माझ्याकडे पाहून तो असहाय पण मनापासून हसला. इतक्यांत ज्या वेडयाचा त्याला आज दोन चार दिवस विरह झाला होता तोच अचानक रस्त्यानें जातांना त्याला दिसला. आमचें संभाषण तसेंच अपुरेंच टाकून तो बाहेर पडला.

वेडयाची आणि त्याची बाहेर गांठ पडली.

वेड्यानें त्याला विचारलें, "मला बुडवून गेलेलीं माणसं तुम्हाला भेटलीं का हो कांहीं? भेटलीं तर त्यांना सांगा— म्हणावं हें चांगलं नाहीं. तुमच्या बुडवण्यामुळं मी अन्नाला महाग झालों आहें! चहा—चहासुद्धां आज चार दिवसांत मला मिळाला नाहीं!"

तो वेडा नव्हता. भ्रमिष्ट होता असें मला वाटलें.

"बरं. या घरांत मी देतों चहा तुम्हाला."

त्यानें त्या वेड्या भ्रमिष्टाला हात धरून आपल्या घरांत आणलें. आणि त्या अवेळींही त्यानें घरांत त्याच्याकरितां चहा करायला सांगितला.

मी हें सर्व बाहेर उभा राहून पहात होतों.

चहा तयार होतांच त्यानें मोठ्या सहानभूतीनें आणि आदरानें त्या भ्रमिष्टाला चहाचा कप दिला.

अधाशीपणानें भरमसाट चहा बशींत ओतून ती बशी घाईघाईनें तोंडाला लावीत त्यानें झटकन ती बशीं रिकामी केली आणि राहिलेला चहा बशींत ओततांना अचकटविचकटपणानें हसत त्यानें म्हटलें,

"अरे लेका, मला बुडविणाऱ्यांत तूंही असला पाहिजेस! आणि आतां तुला पश्चात्ताप होत असला पाहिजे! आणि त्यामुळं आतां सहानुभूतीचं ढोंग करून चहारूपानं माझी थोडी फेड करतोस

काय ? ठीक आहे--सांग तर मग आणखी एक कप चहा ! लवकर मोकळा करतों तुला माझ्या ऋणांतून ! बुडव्या ! !"

आणि तो भ्रमिष्ट एकसारखा हसूं लागला. मला लोकांनीं बुडविलें आहे तेव्हां मी किती मोठा मनुष्य आहें असा त्याच्या बैठकीचा हावभाव होता.

त्या भ्रमिष्टाचें हसणें चालू होतें. मला प्रश्न विचारणाराही हसूं लागला आणि तें जोडहसणें पाहून माझ्या मनानें मात्र गंभीरता धारण केली !

# योगायोग : : ११

मी आतां सांगणार असलेली घटना अत्यंत विलक्षण तर खरीच पण ती अगदीं नेहमीं होणारी असून अत्यंत साधी आहे. साधी असली आणि नेहमीं होणारी असली तरी त्या घटनेंतील विलक्षणपणा, भकासपणा आणि क्रूरपणा किती भयंकर आहे याची आपल्याला आज कल्पना येईल ! आणि या साध्या गोष्टीचाही आपल्या मनावर विलक्षण परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं !

मी राहतों त्याच्या आसपासच एक तरुण राहतो. त्याचें वय असेल सुमारें वीसबावीस वर्षांचें. सुमारें पांचसहा महिन्यांपूर्वी तो माझ्या पहिल्यांदा दृष्टीस पडला.

माणसांत मी साधारण दोन फरक करतों—एक जगणारीं माणसें आणि दुसरीं जळणारीं माणसें.

पहिलीं माणसें असेल त्यांत सोय पाहून जगत असतात. आणि दुसरीं हव्या असलेल्या पण हातीं नसलेल्या सोयी मिळविण्याच्या कार्यांत धडपडत जगतही असतात आणि जळतही असतात.

तो तरुण दुसऱ्या जातीचा होता.

तसें त्याला स्वतःला घरीं फारसें कांहीं कमी नव्हतें. स्वतःच्या चरितार्थाकरितां त्याला उभ्या जन्मांत एक पैसुद्धां मिळविण्याची जरूरी नव्हती.

माझें त्याच्याकडे लक्ष वेधलें त्याच्या डोळ्यांवरून. त्याची ती शोधक आणि अतृप्त दृष्टि पाहून मला फार कौतुक वाटलें. आणि तेवढ्यामुळेंच तो माझ्या लक्षांत राहिला.

तो कोणत्याही चळवळींत असल्याचें माझ्या कानांवर आलें नाहीं. त्याला नोकरी वगैरे कांहींही नव्हती. त्यानें आपलें शिक्षण संपविलें होतें. सध्या त्याचें फक्त वाचनच चाललें होतें. नेहमीं मला तो लठ्ठ लठ्ठ पुस्तकें उघडून खिडकींत वाचीत उभा असलेला दिसे. त्याच्या शरीरयष्टीवरून व अंगकान्तीवरून त्याचा बराचसा वेळ तालमींतही जात असावा हें उघड दिसत होतें. संगीताचाही त्याला खूप नाद होता. पण त्याचें संगीत आजूबाजूला त्रास होणारें नव्हतें.

अलीकडे तो खादी वापरीत असे. नेहरू शर्ट घालून जेव्हां तो पहिल्यांदा आपल्या घरांत हिंडला तेव्हां त्याच्या वडिलांनीं त्याची खूप चेष्टा केली.

त्याच्या घरच्या माणसांत नेहमीं खेळीमेळीचें वातावरण असे. वडिलांनीं थट्टेनें म्हटलें, "या नव्या नेहरू शर्टाचा काय लोभ पडतो तुम्हाला ?" त्यावर त्यानें थट्टेनें उत्तर दिलें, "बाबा, जगांत नवीन असं काय आहे ? जुन्या वस्तु आणि जुने विचार काटछाट करून आणि दुरुस्त करूनच आपण सर्वजण वापरीत असतों. आपण आपल्या मनाच्या समाधानाकरितां फक्त त्याला नवीन

म्हणतों ! खरंच बाबा, नेहरू शर्टमध्यें काय नवीन वाटलं तुम्हाला ? जुनी रामदासी कफनी खालून वीतभर कापली तर नेहरू शर्टशिवाय वर काय शिल्लक राहतं ?"

एक दिवस मला त्याच्याशीं समक्ष बोलण्याचा योग आला. त्यावरून तर त्या तरुणाची किंमत मला फारच वाटायला लागली.

त्याच्या आयुष्याच्या कल्पना उथळही नव्हत्या आणि आखूडही नव्हत्या !

मनांत कोणतीही एखादी गोष्ट भरली कीं तात्पुरतें त्या भावनेनें उचंबळून जाऊन त्या मनांत भरलेल्या गोष्टीपुढें 'झिंदाबाद' म्हणून ओरडून स्वतःचें आयुष्य पेटवायला तो तयार नव्हता !

'कापुराच्या वाती। उजळल्या ज्योती' इतकें तो आपलें आयुष्य हलकें समजत नव्हता !

'शेळी होऊन दोनशें वर्षें जगण्यापेक्षां वाघ होऊन दोन दिवस जगणें बरें' ही म्हण त्याला माहीत नव्हती असें नव्हे, पण 'दोन दिवस जगून मेलेले सर्व वाघ नसतात !' हेंही त्याला माहीत होतें !

—तो स्वतःकरतां कांहीं तरी जीवितकार्य शोधीत होता !

अद्याप त्याचें लग्न व्हायचें होतें. अनेक मुली त्याला दाखविल्या गेल्या होत्या. त्यानेंही पाहिल्या होत्या. लग्नकल्पनेबद्दल तो भेकड नव्हता. लग्न आपल्या जीवितकार्याच्या आड येईल अशी त्याच्या मनाला कधीं कल्पनाही शिवली नाहीं !

असें बरेच दिवस चाललें होतें. एक दिवस मी त्याला विचारलें, "काय हो, अजून लग्न ठरत नाहीं तुमचं ? जीवितकार्य ठरविण्याइतकंच लग्न ठरविणंही अवघड वाटतं कीं काय तुम्हाला ? तुमच्या लग्नाची धांदल तर आज मी बरेच दिवस ऐकतों आहे !"

पण त्यानें मला हसत हसत उत्तर दिलें, "त्याचं असं आहे. मी आतांपर्यंत पाहिलेल्या मुली डोळ्यांत भरण्यासारख्या होत्या पण त्यांत मनांत भरण्यासारखी मला एकही आढळली नाहीं!"

त्या तरुणाला त्याच्या स्वभावाला– वृत्तीला– अनुरूप अशी मुलगी पाहिजे होती!

—आणि अशीही एक मुलगी होती!

* * *

तीही दिसण्यांत फार हुशार होती. चेहेऱ्यावरून अत्यंत सात्त्विक असावी असें वाटे. आणि ती होतीही तशीच!

तीही एका श्रीमंताचीच मुलगी होती. तिचें शिक्षणही बरेंच झालें होतें. मीं तिला बोलतांना ऐकलें आहे. शब्द थोडे आणि अर्थ फार अशी तिच्या बोलण्याची ढब होती. त्या तरुणांत आणि त्या मुलींत एक विलक्षण साम्य होतें. तिचेही डोळे असेच शोधक आणि अतृप्त होते.

पण त्या तरुणाची जगाकडे पाहण्याची लकब थोडीशी हुकमी वाटे, तर ती मुलगी आपल्या अतृप्त आणि शोधक नजरेनें जगाकडे हसतमुखानें पाहत असे.

त्या मुलीची राहाणीही अत्यंत साधी होती.

तिनें आपल्या देहाचा गांवांत मिळणाऱ्या सर्व नखरेल आणि सुंदर वस्तूंचा 'कॅटलॉग' बनविला नव्हता. याचा अर्थ ती अरसिक दिसत होती असें मला बिलकूल म्हणायचें नाहीं!

तिलाही लग्न करून संसार करावयाचा होता. तिच्या घरचीं माणसें त्याच शोधांत होतीं. मुलींचा गळा नेहमीं जात्याच चांगला असतो. तिला गाणेंही उत्तम येत होतें.

मीं पहिल्यांदा वर्णन केलेला तरुण आणि ती मुलगी किती योग्य जोडा होता नव्हे एकमेकांना ? दोघांचा संसार किती सुखाचा झाला असता !

* * *

मीं एका तरुणाचें आणि एका तरुणीचें आतांपर्यंत वर्णन केलें. आणि त्यांचीच गोष्ट मी आज सांगणार आहें. तेव्हां आपण कल्पना केलीच असेल कीं मी त्या दोघांचें लग्न झालें म्हणून तरी सांगणार आहें किंवा लग्न झालें नाहीं असें तरी सांगणार !

मी दुसरी गोष्ट सांगणार आहें.

त्यांचें एकमेकांशीं लग्न झालें नाहीं ! तसा योग त्यांच्या आयुष्यांत नव्हता.

कारण ?

कारणच मोठें चमत्कारिक आहे ! आणि असें असून तें अत्यंत साधें आहे !

मी हमखास सांगतों, आपण विचार करून पहा. आपल्या तें कारण लक्षांत येणार नाहीं. मी आतां तें कारण सांगणारच आहें. पण तत्पूर्वी आपणही विचार करून पहा. मी माझें कारण सांगितल्यानंतर आपणाला सुचलेलीं सर्व कारणें खोटीं ठरणार आहेत !

या बाबतींत आपणाला सुचणारीं कारणें मी सांगतों.

आपण पहिल्यांदा म्हणाल, त्यांच्या आईबापांनीं नकार दिला असेल. पण तसें झालें नव्हतें !

कदाचित् तो आंतरजातीय विवाह असेल ? तेंही कारण नव्हतें !

त्यांच्या एकमेकांच्या पत्रिका पटल्या नसतील ! या दिवसांत पत्रिकांना विचारतो कोण ?

—समाजांत कोणत्याही कारणामुळें खळबळ उडेल असें त्यांच्या लग्नांत कांहींही नव्हतें. देण्याघेण्यांत ठरवाठरवींत वांधा आला नाहीं. मुलाला सासऱ्याच्या पैशावर विलायतेला जायचें नव्हतें— आणि हे कोणतेही प्रकार न होतां त्यांचें लग्न ठरलें नाहीं हेंच मोठें आश्चर्य नव्हे काय ?

मुलीच्या मनांत हें लग्न जमावें असें नव्हतें असेंही नव्हे आणि मुलाच्या मनांत हें लग्न जमू नये असेंही नव्हतें !

—हीच किंनई साधारण तुम्हांला सुचणारीं कारणें ?

कदाचित् आणखीही कांहीं तुम्हाला सुचलीं असतील. पण मीं सांगणार असलेलें कारण त्यांत नाहीं, हें मी तुम्हाला पुनः बजावून सांगतों !

* * *

—पण अनुरूप वधूवरें एकत्र आल्यानें 'सुखी संसारच' निर्माण होतील या कल्पनेवर माझा तितकासा विश्वास नाहीं !

आणि ही कल्पना तरी इतक्या वैशिष्ट्यानें लोकांच्या मनांत कुणीं भरविली ?

आम्हीं कथालेखकांनीं, कादंबरीकारांनीं आणि नाटककारांनीं ! आम्हा लेखकांच्या मनावर या कल्पनेचा विलक्षण पगडा आहे ! किंवा या कल्पनेचें आम्हांला विलक्षण वेड आहे असेंही म्हणा पाहिजे तर !

हातीं धरलेल्या वधूवरांचे गुण खुलवून दाखविण्यांत आणि त्यांच्या विवाहास आड येणाऱ्यांचे दोष भयंकरपणानें रंगविण्यांत आम्ही लेखक आपली सर्व प्रतिभा खर्च करतों ! आणि स्वतःच्या कल्पनासृष्टीचा लेखकच पूर्ण नियंता असल्यामुळें पुष्कळ वेळेला

आम्हाला अनुरूप वाटणाऱ्या त्या दोन वधूवरांचीं लग्नें आम्ही लावून देतों.

पण खरे सुखी संसार या अशा लग्नांपासून हमखास निर्माण होत असतील का? नुसत्या कल्पनांचा मला भयंकर राग आहे. या बाबतींत मला तुमची साक्ष पाहिजे! संसारी लोकांनीं खरें म्हणजे या बाबतींत बोलायला पाहिजे. आपले अनुभव सांगायला पाहिजेत! जीं विवाहित असतील आणि ज्यांचीं वैवाहिक आयुष्यें सुखी असतील त्यांना आपले अनुभव जर लोकांना सांगायचे नसतील तर लोकांना सांगण्याकरितां म्हणून नव्हे तर निदान स्वतःच्या पोराबाळांना तरी सावध करण्याकरितां— त्यांनीं स्वतःशींच या बाबतींत विचार करून ठेवावेत! त्यांच्या संसारांत जें सुख निर्माण झालें असेल तें केवळ एकमेकांच्या अनुरूपतेमुळें खास नव्हे असें त्यांना आढळून येईल.

मला असें म्हणायचें आहे कीं सुख हें मिळत नाहीं— तें मिळवावें लागतें— घ्यावें लागतें!

आतांपर्यंत विवाहपूर्व अनुरूप वधूवरांचीं स्तुतिस्तोत्रें गातां गातां आणि त्यांच्या रम्य हालचालींचीं नानाविध वर्णनें करण्यांत अनेक कथाकादंबरीकारांनीं आपआपल्या लेखण्या शिणविल्या आहेत. पण त्याच वधूवरांचें विवाहानंतर काय झालें, त्यांचे संसार खरेंच सुखी झाले का, याचें चित्र रेखाटण्याचें आम्हांपैकीं कोणींही केलेलें नाहीं!

असें कां? तें तसें सहज राहून गेलें आहे कीं बुद्धिपुरःसर टाळलें गेलें आहे याचा आम्हीं लेखकांनीं विचार केला नसला तरी लोकांनीं मात्र जरूर करावयाला पाहिजे!

या कल्पनेवर भरारी मारणाऱ्या लेखकांना तींच विवाहपूर्व चित्रें रेखाटण्याकरितां तसेच सोडून देऊन आपण आपल्या प्रत्यक्ष जीवनाकडे पाहिलें पाहिजे. म्हणजे आपणाला कळेल— संसारांत सुख तडजोडीच्या वृत्तीनें निर्माण होतें !

मनुष्यस्वभाव ! एकमेकांचे स्वभाव ! पण ते पहिल्यांदा कळतात कुठें आणि सुरुवातीला त्याकडे लक्ष तरी कुणाचें असतें ? प्रथम लक्ष असतें एकमेकांच्या हालचालींकडे. हिच्या रंगीबेरंगी पातळाकडे– आणि त्याच्या ब्लेझरच्या कोटाकडे ! हिच्या केशरंजनाकडे आणि त्याच्या टेनिसच्या रॅकेटकडे– एकमेक न्याहाळून पाहत असतात ! निदान अशीं वर्णनें तरी आपण नेहमीं वाचतों. आणि याच्यांत स्वभावाचा फारसा कुठें संबंध येतो काय ?

मला सांगायचें येवढेंच कीं सुरुवातीला आपल्याला हवें तें माणूस मिळालें नाहीं म्हणून प्रेमनिराश होण्याचें कारण नाहीं ! तेवढ्याचकरतां आपल्या आयुष्याचा कुणीं बंगाली 'देवदास' करून घेऊं नये !

आणि एकसारखीं एक अशीं दोन आयुष्यें शेजारीं शेजारीं आलीं म्हणून सुख निर्माण होईलच हें मला पटत नाहीं.

दिव्याशेजारीं दिवा लावला तर आरास निर्माण होते— आयुष्य निर्माण होत नाहीं !

वैचित्र्य हा जगाचा धर्म आहे ! वैचित्र्यांत आनंद आहे !! वैचित्र्यांत सौंदर्य आहे !!!

आणि हुकुमाचीं तेरा पानें हातीं आल्यानंतर डाव खेळण्यांत गंमत नसते. तिथें खरें खेळणें संपलेलें असतें. आपल्या हातांत अपुरीं पानें असलीं तरच डाव खेळण्याला रंग येतो, हुरूप येतो !

आणि सगळे हुकूम हातीं आल्यानंतर खेळण्यांत काय मौज आहे ? ती नुसती आयुष्याची कत्तल आहे !



आतां त्या दोन तरुणतरुणींच्या लग्नाचा योग कां आला नाहीं तें सांगतों !

तें कारण असें.

मीं वर्णन केल्यासारखा एक मुलगा जन्माला आला असून तो आपल्या गांवांतच नांदतो आहे याची त्या मुलीला किंवा तिच्या घरच्या माणसांना अजीबात बातमी नव्हती ! आणि अशी एक आपल्या मुलाला अनुरूप असलेली मुलगी जन्माला आली असून ती आपल्या गांवांतच आहे याची त्या तरुणाला किंवा त्याच्या घरच्या माणसांना अजिबात बातमी नव्हती !

आणि केवळ यामुळेंच त्यांचें लग्न होऊं शकलें नाहीं !

—गोष्ट साधी आहे पण किती भयंकर आहे नाहीं ?

याच्यांत चूक कुणाची होती ? कुणाचा हेवादेवा त्यांच्या आड आला ?

एकमेकांना अनुरूप अशीं दोन माणसें निर्माण होऊन सुद्धां त्यांची एकमेकांना माहिती कां होऊं नये ? याला जबाबदार कोण ?

आणि आपल्याला अनुरूप असें कांहीं आपल्या नजरेच्या कक्षेंतून निसटूं नये येवढ्याचकरितां माणसाची दृष्टि अतृप्त आणि शोधक असते का ?

पत्त्याच्या डावांत जशीं हुकुमाचीं सर्व पानें असतात त्याप्रमाणें जगांतही माणसाला हव्या असलेल्या सर्व जिनसा आहेत ! पण

त्या आपण शोधायच्या असतात, युक्तीनें सर करावयाच्या असतात! आणि आपल्या या खेळण्यालाच आयुष्य असें नांव आहे!

  

त्या दोघांकडे पाहिलें कीं मला अद्याप वाटतें कीं यांत चूक कोणाची आहे? मला या दोन माणसांची माहिती होती म्हणून ती चूक कदाचित् तुम्ही माझ्यावर लादाल!

—पण त्यांतही एक आघात आहे!

तीं दोन माणसें मीं पूर्ण निरखिल्यानंतर आणि मला तीं दोघें एकमेकांना पूर्ण अनुरूप आहेत असें वाटल्यानंतर मीं अत्यंत आतुरतेनें ही बातमी मुलीच्या घरीं कळविली आणि त्यांच्या पूर्ण संमतीनें जेव्हां मुलाच्या घरीं मी ही बातमी सांगायला गेलों—

त्या दिवशीं मला काय कळलें?

त्या सकाळींच दुसऱ्या एका मुलीशीं त्या तरुणाचा विवाह ठरला होता. त्यांच्या लग्नाची तीथही ठरली होती!



## तो दिवस ! : : : १२

घरांतलें चालू घड्याळ एखाद्या दिवशीं हलगर्जीपणानें किल्ली द्यावयाचें विसरून बंद पडलें— आणि तें आपल्या लक्षांत आलें कीं बंद पडलेल्या घड्याळाकडे पाहून आपल्या विचारांना एक निराळ्या प्रकारचीच गति मिळते !

आणि अशा वेळेला मला मात्र वाटतें कीं तें घड्याळ बंद राहून जसा काळ चालू राहिलेलाच असतो त्याप्रमाणें कारण नसतांना सर्व माणसांच्या हालचाली एकदम जिथल्या तिथें राहिल्या —जिवंतपणा मात्र कायम राहून— आणि फक्त काळच चालू राहिला— तर तो स्तब्धतेचा काळ फार अलौकिक वाटेल माणसांना ! स्वर्गसुख का काय म्हणतात ना— त्याच्यापेक्षांही असा काळ कांहीं तरी अलौकिकच आनंद देईल माणसांना !

ही कल्पना जरा विचित्र वाटेल. पण थोडासा विचार केला तर असें सुख अत्यंत अल्प प्रमाणांत प्रत्येक मनुष्य अनुभवीत असतो.

—सगळ्या जगाच्या हालचाली एकदम थांबत नाहींत कधीं

— पण आपली हालचाल मात्र एखाद्या दिवशीं अशी अचानक थांबते. जग चालू असतें— काळ चालू असतो.—आणि त्या बंद पडलेल्या घड्याळाप्रमाणें आपण मात्र थांबलेले असतो.

—साधारण मी स्वतःच्या आयुष्याकडे एखाद्या वेळेला जेव्हां मागें वळून पाहतों तेव्हां माझ्या लक्षांत येतें कीं, जवळ जवळ सहा सहा महिन्यांच्या अंतरानें असा विचित्र दिवस माझ्या आयुष्यांत येऊन गेलेला आहे !

—कीं, ज्या दिवशीं जग चालू असतें आणि मी थांबलेला असतों !

—अशा उजाडणाऱ्या दिवसाची मला आधल्या रात्रींसुद्धां बिलकुल कल्पना नसते ! बरोबरच आहे, आपण घड्याळ बंद पडावें म्हणून मुद्दाम किल्ली द्यायचें विसरत नाहीं ! तें आपो-आपच होतें !

—माझ्या अशा दिवसाची सुरवात अशी होते :

—नेहमींच्या उठण्याच्या वेळेपेक्षां त्या दिवशीं मला जागही जरा उशीरांच येते. रोजचीं वर्तमानपत्रें खिडकीवाटे माझ्या अंथरुणाभोंवतीं येऊन पडलेलीं असतात. मी थोड्या उशीरानें आळसटलेलाच उठतों. तीं येऊन पडलेलीं वर्तमान पत्रें पाहून मला चीड येते.

काय वाचायचें रोज रोज तेंच तेंच ? चीनचें अमकें झालें; जपानचें तमकें झालें ! एका विचित्र गांवांत तीन तोंडांचें मूल जन्मलें ! अमक्यानें आत्महत्या केली. आणि कोठें तरी तांबड्या किंवा पिवळ्या रंगाचा पाऊस पडला !

मी आळसांतच उठतों, अंथरूण गोळा करतों, तीं वर्तमानपत्रें

तिरस्कारानें आंधळ्यासारखीं उचलतों आणि अंथरुणाखालीं दड-पून ठेवतों.

बस्स ! जगाचें काय चाललें आहे हें मला समजायला नको आहे आजच्या दिवस !

—आणि मग आपण रहात असलेलें घर किती लांबरुंद आहे हें जणूं मी पावलें टाकून मोजीत आहें अशा आविर्भावांत मी चालायला लागतों. नेहमींची सवय म्हणून हातातोंडावर पाणी घेतों. पण पाण्याचा गारपणा त्या दिवशीं मला जाणवत नाहीं !

—तयार होऊन पडलेला चहा माझ्यापुढें केला जातो. मीही घेतों. पण त्या दिवशीं माझ्या तोंडाची चव गेलेली असते. मी चहा पितों आहें का पाणी पितों आहें याचेंही मला त्या दिवशीं भान रहात नाहीं ! त्या दिवशीं मला कोणीं निवळ पाणी जरी कपांत दिलें असतें तर फक्त रंगावरूनच तें माझ्या लक्षांत आलें असतें; चवीवरून नव्हे !

—आणि असा दिवस बहुधा सुट्टीच्या दिवशींच उगवतो !

—मी घुम्यासारखा माझ्या बसायच्या खोलींत येऊन बसतों. खोलीमध्यें कांहीं अत्यंत आवडीनें जमा केलेल्या जिनसा— टेबल, खुर्ची वगैरेंकडे पाहून त्या दिवशीं मला असें वाटतें कीं काय बिनाकारण अडगळी भरून ठेवल्या आहेत मी आपल्या खोलींत ! यांतील प्रत्येक गोष्ट जरी नाहींशी झाली तरी माझें यत्किंचितही अडायचें नाहीं ! आणि एकवार लगेच वाटतें, त्या जिनसा निर्जीव नसून सजीवच आहेत; त्यांच्या फक्त हालचालींची किल्ली संपली आहे. आणि स्वतः स्तब्ध राहून त्या त्या जिनसा फक्त जगाची हालचाल निरखीत बसल्या आहेत ! स्तब्धतेचा आनंद अनुभवीत

जणूं समाधि लावूनच बसल्या आहेत !

विचारांची ही असली निशा कांहीं वेळ टिकते.

तोंच ऋषींची तपश्चर्या भंग करण्याकरितां जशा स्वर्गातून पुराणांत अप्सरा येत त्याप्रमाणें माझ्याकडे 'हा' 'तो' यांची रीघ लागते.

कुणी येतो आणि सांगतो—

"आज माझ्या मुलाला-टायफॉईड झाला आहे !"

स्तब्ध असलेल्या माझ्या मनाला त्या वेळीं वाटतें, "मग यांत तक्रार करण्यासारखें किंवा वाईट वाटण्यासारखें काय आहे ? जगांत अशी काहींतरी हालचाल चालायचीच ! अमृतकुंभ बाहेर काढण्याकरितां जसें देवदानवांनीं समुद्रमंथन केलें त्याप्रमाणें कांहींतरी अलौकिकाचा लाभ होण्याकरितां— जीवनाचा जगण्याचा कोलाहल चालू आहे ! आणि अलौकिकाच्या भेटीकरितां माणसाच्या वृत्ति बेभानच असायला पाहिजेत. आपल्या मुलाला टायफॉईड झाला याबद्दल वाईट वाटण्यापेक्षां— 'पण प्लेग तर नाहीं ना झाला !' असें वाटून माणसांनीं हुरूपानें हसायला पाहिजे !"

पण प्रत्यक्ष मी कांहींच बोलत नाहीं ! मौनव्रत धरलेला माणूस जसा खुणा करून आपला व्यवहार भागवतो ! —काय जिवाची— जनाची— मनाची— फसवणूक आहे ही ? कुणीं सांगितला होता येवढा मौनाचा अट्टाहास करायला ?

सर्वांना कदाचित् माहीत असलेली फौजदाराची गोष्ट आठवते त्या वेळीं मला. तो फौजदार पूजेच्या वेळीं असाच मौनांत असायचा आणि त्याकडे कुणी त्या वेळीं आलें कीं तो आरोपींना सांगायच्या

शिक्षा देवांच्या द्वारा सांगत सुटायचा !

एकदां त्याला एका आरोपीला ‘उलटा टांगून फटक्याची सजा द्या’ असें सांगायचें होतें. त्यानें देवांतला बाळकृष्ण उलटा एका हातांत धरला आणि दुसऱ्या हातानें पळीनें तो बाळकृष्ण त्यानें बडवायला सुरवात केली !

पण हा आचरटपणा करूनही देवदेवतार्चन करतांना आपण बोलत नाहीं हा आपला अभिमान त्याला टिकवतां आलाच !

तसेंच माझें होतें त्या दिवशीं ! माझ्या मनांतून त्या दिवशीं कुणाशींही फारसें बोलायचें नसतें.

पण माणसें आलीं आणि बोलायला लागलीं तर काय करणार मनुष्य ?

त्या दिवशीं माझ्याकडे आलेलीं माणसें शक्य तितक्या कमी शब्दांत मी परतवीत असतों !

एरवीं माझा स्वभाव बोलका असल्यामुळें त्या दिवशीं लोकांनाही जरा चमत्कारिकच वाटतें.

मग आलेलीं माणसें मलाच विचारायला लागतात,

“काय, आज तब्येत ठीक नाहीं वाटतं ?”

“हूं !”

“का डोकं दुखतं आहे ?”

“हूं ! किंचित् !”

—दुसरा दुसऱ्या वेळीं विचारतो, “कांहीं कसर वगैरे आली आहे ?”

मी म्हणतों, “हूं ! किंचित्.”

जो कोणी कुतूहलानें ‘अमकं होतं आहे का ?’ असें विचारतो

त्याला मी 'तेंच होतं आहे' म्हणून सांगतों !

कारण काय— त्या दिवशीं मला काय होत असतें हें माझें मलाच माहीत नसतें !

अशा तऱ्हेनें त्या दिवशीं मी थांबलेला असतों. आणि जग चालू असतें.

अशांतच दुपार होते. जेवण होतें.

आणि मग कुणी आपणाकडे येऊं नये म्हणून का झोप येत असते म्हणून, कुणास ठाऊक, खिडक्यादारें लावून मी स्वस्थ पडतों ! त्या दिवशीं माझी झोपायची सुद्धां इच्छा नसते. पण कांहीं वेळानें मी जागा असत नाहीं हेंही खरें !

—आणि नंतर मी जागा होतों दुपारीं चारच्या सुमारास !

—आणि मग एखादा जिन्नस आंबवावा तशी माझ्या मनाची स्थिति होते ! सकाळीं निर्माण झालेली मानसिक उदासीनता झोपेनें आणखी खूप आंबते—नंतर मला अगदीं झिंगल्यासारखें होतें.

मग कुठें आळ्याकडे पहात बस, कुठें खिशांतल्या चिठ्या-चपट्या पहात बस, बसलेल्या सतरंजीचें टोंकच दुमड—पुनः होतें तसें करून ठेव, अशा निरर्थक हालचालींत मी वेळ घालवतों !

—तोंच उन्हें मावळूं लागतात— म्हाताऱ्या बायका देव-दर्शनाला पुराणाला म्हणून बाहेर पडलेल्या रस्त्यानें दिसूं लागतात.

—घरांत डोकावून पहावें तों दिव्याची तेलवात चाललेली असते.

—आणि मग मी कांहींतरी कल्पनेनें पिसाळतों. त्या कल्पना मला सांगतां येणार नाहींत, लिहितां येणार नाहींत, पण त्यांच्यां-तील एक कल्पना मात्र स्पष्ट असते व तीच मला जास्त भीति-

दायक वाटते !

लोकांचीही आतां फिरायला बाहेर जायची वेळ झालेली आहे ! मीही नेहमीं माणसांत वावरणाराच आहें ! आतां माझ्याकडेही कांहीं माणसें येतील कदाचित् ! आणि या कल्पनेनेंच मी फार पिसाळतों. त्या दिवशीं मला माणसें नको असतात– कां ?

—मी लगबगीनें घराबाहेर पडतों. हातांत सायकल असतेच ! तीही बरेच दिवसांत पुसलेली नसतेच ! तिच्यावर सांचलेली धूळ पाहून मला आनंद वाटतो. कारण माझ्याही मनावर त्या दिवशीं कसली तरी धूळ सांचलेली असते.

—सायकलवर बसून फिरायला त्या दिवशीं मला फार मौज वाटते. बरोबर कुणी नाहीं म्हटलें तर सायकल आहे. मला आज कुणाशीं बोलायला नको असतें. सायकलही बरोबर असून बोलूं शकत नाहीं !

—मी रस्त्यानें संथ चाललेला असतों. आजूबाजूला शून्य दृष्टीनें पहात असतों. तोंच मी एकदम कुठें तरी वळण घेतों—

—कां ?

—समोरच मला कोणीतरी ओळखीचा चेहरा दिसतो. हा आपल्याला खासच छटकणार— त्या आधींच पळा— या भावनेनें ! अगदीं एखादा देणेकरी जसें सावकाराचें तोंड चुकवितो तितक्या तत्परतेनें !

—त्या दिवशीं मला कुणाशीं बोलावेंसें वाटतच नाहीं !

—खूप उशीरां मी घरीं परततों. या विनाकारणच्या धावपळीनें मी घामाघूम झालेलाच असतों ! घरांत येऊन अंगाचा घाम पुशीत मी घरांत सांगतों, “आज मला भूक नाहीं; मला जेवायचं नाहीं !”

—आणि मी आपल्या खोलींत येऊन पडतों. तिथें दिवा लावलेला नसतो. मीही त्याची काळजी करीत नाहीं! घरांत मी आलेला कळून— घरांत तर कुठें दिसत नाहीं— म्हणून माणसें चौकशी करतात. तोंच कशानें तरी माझी चाहूल त्यांना लागते!

—पोरेंवाळें त्या दिवशीं माझ्या खोलींत येऊं शकत नाहींत.

"नेहमीचं आहे हें असं!" असें म्हणून कोणीतरी येऊन खोलींत दिवा लावून जातें. तें कोणीतरीही त्या दिवशीं मला मोह घालूं शकत नाहीं.

—आणि नंतर खूपशा वेळानें मला गुंगी येते.

—कोणीतरी येऊन दिवा मालवून गेल्याचें माझ्या पुसट लक्षांत येतें आणि मग मला शान्त झोप लागते.

* * *

—बरेच दिवस मी विचार करीत होतों कीं असा दिवस मध्येंच कां उगवतो? मला कांहीं सुचत नव्हतें. असा दिवस पुनः येण्याची वेळ येत चालली होती. आणि म्हणून हल्लीं त्याबद्दलच मी जोरांत विचार करीत होतों. असें माझेंच होतें का सर्वांचें होतें याचाही मी आजुबाजूला कानोसा घेऊन पाहिला— तर अगदीं इतक्या वैशिष्ट्यानें जरी नव्हे तरी 'असं कधीं कधीं होतं' असें ऐकायला मिळालें— आणि हें कळल्यापासून तर जास्त जोरानें असा दिवस कां उगवतो याचा मी विचार करूं लागलों.

—आणि माझें समाधान होण्यापुरतें मला त्याचें उत्तर परवांच सुचलें. आपण आपला सहवास— आईचा आईला दिलेला असतो —मित्रांचा मित्रांना दिलेला असतो— मुलांचा मुलांना— बायकोचा बायकोला दिलेला असतो. आणि या सर्व धांदलींत स्वतःचा

सहवास जो स्वतःला हवा असतो त्याची आपल्याला आठवण राहिलेली नसते.

—त्याची आठवण देण्याकरितां तो उदासीन दिवस उगवलेला असतो !

—माणसाला जशी ताजेतवानें होण्याकरितां झोपेची आवश्यकता असते त्याप्रमाणेंच स्वतःचा स्वतःला सहवास होण्याची जरुरी असते. झोपेंत जसे आपण जगाला विसरतों तशीच अशा दिवशीं जगाबद्दल आपल्याला बेपर्वाई वाटते— उदासीनता वाटते आणि—

* * *

—दुसऱ्या दिवशीं मी जों जागा होतों तों मला वाटतें जगाचाही पुनर्जन्म झाला आहे— माझाही पुनर्जन्म झाला आहे— आणि राहिलेला डाव पुनः खेळायला घ्यावा त्याप्रमाणें नूतन उत्साहानें, नव्या उमेदीनें, मी माझ्या आयुष्यास पुनः सुरवात करतों !

---